शिक्षण खात्याचा मंजुरी क्रमांक : पापुमं/१०९९/६२१७३/५ वी बालभारती/मराठी/
स. पु. दि. १०.३.९९

# मराठी

# बालभारती

## इयत्ता पाचवी



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
पुणे.

| | | |
|---|---|---|
| प्रथमावृत्ती : १९९९<br>पुनर्मुद्रण : २००१ | © | महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ पुणे - ४११ ००४.<br>या पुस्तकाचे सर्व हक्क महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाकडे राहतील. या पुस्तकातील कोणताही भाग संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ यांच्या लेखी परवानगीशिवाय उद्‌धृत करता येणार नाही. |
| मराठी भाषा समिती | : | प्राचार्य राम शेवाळकर, अध्यक्ष<br>व. द. देसाई, सदस्य<br>ह. गं. नारलावार, सदस्य<br>रेणू दांडेकर, सदस्य<br>वर्षा सहस्रबुद्धे, सदस्य<br>शीला गुर्जरपाध्ये, निमंत्रित सदस्य<br>डॉ. शरणकुमार लिंबाळे, निमंत्रित सदस्य<br>माधव राजगुरू, सदस्य-सचिव |
| संयोजन प्रमुख | : | माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग |
| सहायक | : | श्रीमती उषादेवी देशमुख, विषय सहायक, मराठी |
| चित्रकार | : | मुकुंद तळवलकर, राहुल देशपांडे |
| मुखपृष्ठ | : | रवी परांजपे |
| अक्षरजुळणी | : | मुद्रा विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४. |
| निर्मिती | : | श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. कमळाकर आगास्कर, निर्मिती अधिकारी |
| कागद | : | ६१ x ८६ सेमी, ६० जी. एस. एम., क्रीम वोव्ह |
| मुद्रणादेश | : | N/PTG/T.B./ 3768 |
| मुद्रक | : | मे. मॉडर्न आर्टस् ॲंड इंडस्ट्रीज, १५१ ए टू झेड इंडस्ट्रियल इस्टेट, वरली, मुंबई ४०० ०१३. |
| प्रकाशक | : | श्री. एन. के. राठोड<br>प्र. नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती<br>गोरेगाव, मुंबई - ४०० ०६२. |

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

## प्रस्तावना

महाराष्ट्र राज्यात इयत्ता १ ली ते ५ वीकरिता 'क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५' तयार करण्यात आला. या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी विषयाची इयत्ता १ ली ते ५ वीची नवीन 'बालभारती' माला पाठ्यपुस्तक मंडळ प्रकाशित करत आहे. या मालेतील हे पाचवे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

प्राथमिक शिक्षणातील इयत्ता १ ली ते ५ वीपर्यंतचा 'निम्न प्राथमिक स्तर' हा शिक्षणाचा मूलभूत पाया असतो. यातील भाषाशिक्षणाचे स्थान विशेष महत्त्वाचे आहे.

मुलांचे भाषाशिक्षण हे त्यांच्या घर आणि परिसरापासून सुरू होते. श्रवण, भाषण-संभाषण, वाचन व लेखन या चार भाषिक कौशल्यांपैकी श्रवण आणि संभाषण ही कौशल्ये थोड्याफार प्रमाणात शाळेत येण्यापूर्वीच विद्यार्थ्यांनी आत्मसात केलेली असतात. वाचन आणि लेखन या दोन कौशल्यांचा विकास मूल शाळेत आल्यानंतर सुरू होतो. ही भाषिक कौशल्ये आणि अभ्यासक्रमात दर्शवलेल्या भाषेच्या सर्व क्षमता विद्यार्थ्यांमध्ये विकसित करणे आणि त्यांच्यावर मूल्यांचे उत्तम संस्कार करणे, ही प्राथमिक शिक्षणाची उद्दिष्टे आहेत. ही उद्दिष्टे पाचव्या इयत्तेच्या अखेरीस पूर्ण झाली पाहिजेत, या दृष्टिकोनातून पाठ्यपुस्तकाची रचना करताना आवश्यक ती काळजी घेण्यात आली आहे.

पाठांची उद्दिष्टे आणि पाठांचा नेमका आशय कळावा, यासाठी पाठांच्या प्रारंभी पाठपरिचय दिलेला आहे. अध्ययन आणि अध्यापन अधिक प्रभावी आणि सुलभ व्हावे, यासाठी पाठाखालील प्रत्येक स्वाध्यायास क्षमता क्रमांक दिले आहेत. अभ्यासक्रमात निर्धारित केलेले व्याकरण गद्य पाठांखाली स्वाध्यायांसह दिले आहे. मराठी भाषेच्या लेखनविषयक नियमांची माहिती विद्यार्थ्यांना व्हावी आणि त्यांचे लेखन निर्दोष व्हावे, म्हणून व्याकरणाबरोबरच 'लेखनविषयक ढोबळ नियम' मार्गदर्शनार्थ दिले आहेत.

हे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष आणि दर्जेदार व्हावे, या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील प्राथमिक शिक्षक व विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले. समीक्षकांच्या सूचना व अभिप्राय यांचा मराठी समितीने योग्य तो विचार करून या पुस्तकाला अंतिम स्वरूप दिले आहे.

मराठी भाषा समिती आणि चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमातून हे पुस्तक तयार झालेले आहे. हे पाठ्यपुस्तक तयार करताना मराठी समितीला श्री. वि. द. इनामदार आणि श्री. दिलीप फलटणकर यांचे विशेष सहकार्य लाभले, त्यांचे आणि संबंधित साहित्यिक, शिक्षणतज्ज्ञ, समीक्षक या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

(डॉ. वसंत काळपांडे)
संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे ४

पुणे
दिनांक : २७ जानेवारी, १९९९
७ माघ, शके १९२०

## क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तके

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत शिक्षणाचा प्रसार खूप झाला; पण त्याच्या गुणवत्तेबाबत शाळा-शाळांमध्ये, प्रांता-प्रांतांमध्ये फरक पडला. गुणवत्तेबाबत उद्भवलेल्या या प्रश्नावर क्षमताधिष्ठित अध्ययन-अध्यापन हा एक उपाय आहे. प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला काय यायला हवे, याचा विचार म्हणजेच अध्ययन क्षमतांचा विचार. यात प्रत्येक विद्यार्थ्याने जास्तीत जास्त क्षमता प्राप्त केल्या पाहिजेत, अशी अपेक्षा आहे. विद्यार्थ्याच्या वर्तनात अपेक्षित बदल दिसून आला, तर त्याने संबंधित क्षमता प्राप्त केली असे म्हणता येईल; मात्र हा बदल टिकाऊ स्वरूपाचा असला पाहिजे. हे टिकाऊ स्वरूपाचे बदल घडवूनच प्राथमिक शिक्षणात गुणात्मक सुधारणा करता येईल.

अभ्यासक्रमाच्या (क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५) विविध क्षेत्रांमध्ये क्षमतांच्या विकसनाचे जे टप्पे दर्शवलेले आहेत ते परस्परावलंबी आहेत. त्यांतील संबंध लक्षात घेऊन पाठ्यपुस्तकाची रचना करण्यात आलेली आहे; म्हणूनच प्रत्यक्ष अध्यापनाच्या वेळी पाठ्यपुस्तकातील क्रम तोच ठेवायचा आहे.

क्षमताधिष्ठित अध्यापन हा काही अध्यापनातील पूर्णतया नवीन प्रयोग किंवा नवीन सिद्धान्त नाही; परंतु आता अभ्यासक्रमात नमूद केलेल्या क्षमता वर्गातील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रभुत्व पातळीवर प्राप्त झाल्या पाहिजेत, यासाठी प्रयत्न करायचे आहेत. अपेक्षित कृती विद्यार्थ्याला अचूकतेने, सहजतेने आणि योग्य त्या गतीने करता आली, म्हणजे त्याने संबंधित क्षमतेची प्रभुत्व पातळी गाठली असे म्हणता येईल. पाठ्यपुस्तकाचा वापर क्षमतेवरील प्रभुत्वासाठी

करायचा आहे. त्यासाठी पाठ्यपुस्तकातील सामग्रीबरोबरच शिक्षकाने स्वतः तयार केलेले साहित्यही वापरणे अपेक्षित आहे.

शिक्षकांचा हेतू केवळ पाठ्यपुस्तक संपवणे असा असता कामा नये, वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना विशिष्ट क्षमता प्राप्त करून देणे हा हेतू असावा. जरूर तेथे अध्यापनाचा वेग कमी-जास्त करून तसेच उजळणी, नवीन उपक्रम, विविध स्वाध्याय इत्यादींचा वापर करून तो साध्य करायचा आहे.

वर्गातील सर्व विद्यार्थी विशिष्ट क्षमतेकडे बरोबरीने जावेत, यासाठी पाठ्यपुस्तकात अनेक प्रकारचे स्वाध्याय, उपक्रम आणि कृती दिलेल्या आहेत. त्या कशा घ्यायच्या याच्या सूचनाही दिलेल्या आहेत. विद्यार्थी क्षमता संपादनाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत आणि संपादन केलेली क्षमता टिकून आहे की नाही, याचे मूल्यमापन सातत्याने करायचे आहे. एखादी क्षमता प्राप्त झाली नाही किंवा टिकून राहिली नाही असे आढळल्यास उपचारात्मक उपक्रमांची सोय केली पाहिजे. पाठ्यपुस्तकात नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. त्या प्रश्नांचा तसेच त्या धर्तीवर तयार केलेल्या जास्तीच्या प्रश्नांचा शिक्षकांनी वापर करावा.

क्षमताधिष्ठित अध्यापनाचा आणखी एक विशेष म्हणजे प्राप्त झालेल्या क्षमतेचा वापर विद्यार्थ्यांना बाह्य जगात करता येणे. मूल्यमापनात या उपयोजनाचाही समावेश शिक्षकाने केला पाहिजे.

विद्यार्थ्याला होणारी क्षमतेची प्राप्ती वैयक्तिक आहे; मात्र त्याने ती संपादन करण्याची प्रक्रिया सांघिक आहे. त्या स्वरूपाच्या अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि अध्ययनात सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल अशी अपेक्षा आहे.

## क्षमतांची यादी
## (१९९५ च्या अभ्यासक्रमातून)

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| श्रवण | १.५.१ | पाठांतर, नाट्य-संवाद आणि वादविवाद समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.५.२ | अपरिचित प्रसंगातील संवाद, संभाषण आणि चर्चा समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.५.३ | सामूहिक कृतीसंबंधी दिलेल्या सूचना समजपूर्वक ऐकता येणे. |
| भाषण | २.५.१ | सहज आणि ओघवते बोलता येणे. |
| | २.५.२ | परिचित अशा साध्या विषयावर बोलता येणे. |
| | २.५.३ | प्रसंगांचे व घटनांचे वर्णन करता येणे. |
| | २.५.४ | बालनाट्य, वादविवादात भाग घेणे, तसेच औपचारिक निवेदन करता येणे. |
| वाचन | ३.५.१ | सुलभ आकृत्या, तक्ते आणि नकाशे समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.५.२ | छापील व हस्तलिखित मजकूर समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.५.३ | वर्तमानपत्रे व इतर छापील मजकूर समजपूर्वक वाचता येणे. |
| लेखन | ४.५.१ | योग्य अंतर ठेवून योग्य प्रकारे लिहिता येणे. |
| | ४.५.२ | विरामचिन्हांचा योग्य उपयोग करून मजकुराचे श्रुतलेखन करता येणे. |
| | ४.५.३ | साधी, सोपी पत्रे, संवाद आणि छोटे निबंध स्वतंत्रपणे लिहिता येणे. |
| आकलन | ५.५.१ | लेखी किंवा तोंडी सांगितलेल्या माहितीवरून अनुमान बांधता येणे. |
| (ऐकून व वाचून) | ५.५.२ | पाठ्यभाग वाचून किंवा ऐकून असे असते तर (काय झाले असते ?), असे नसते तर (काय झाले असते ?) अशा प्रश्नांची उत्तरे देता येणे. |
| कार्यात्मक व्याकरण | ६.५.१ | शब्दांच्या जातीसंबंधीचे साधे नियम समजून वापरता येणे. |
| स्वयंअध्ययन | ७.५.१ | शब्दकोशाचा उपयोग करता येणे. |
| भाषेचा व्यवहारात उपयोग | ८.५.१ | दैनंदिन जीवनामधील परिचित / अपरिचित प्रसंगात बोलताना / लिहिताना / वाचन करताना भाषेचा योग्य प्रकारे वापर करता येणे. |
| शब्दसंपत्तीवर प्रभुत्व | ९.५.१ | सुमारे ५००० शब्दांचे आकलन होणे. |

**अभ्यासक्रमातील कोणत्या अध्ययन क्षमतेसाठी कोणते अध्ययन अनुभव / उपक्रम घ्याल ? खालील तक्ता पाहा. याचा वर्षभर उपयोग करा.**

| अध्ययन क्षमता क्रमांक | | अध्ययन अनुभव / उपक्रम |
|---|---|---|
| १.५.१ | १. | शालेय समारंभ, उत्सव, स्नेहसंमेलन, स्पर्धा इत्यादी माध्यमांतून भाषणे, पाठांतर, नाट्य, संवाद व वादविवाद ऐकण्याची संधी मुलांना प्राप्त करून देणे. एक-दोन प्रश्न विचारणे. |
| १.५.२ | १. | सहली, भेटी इत्यादींमधून विविध स्तरांवरील व्यक्तींचे संभाषण किंवा त्यांच्यातील संवाद ऐकण्याची संधी मुलांना मिळवून देणे. |
| | २. | आकाशवाणी, दूरदर्शन व ध्वनिफिती या माध्यमांमधून संवाद, संभाषण व चर्चा हे कार्यक्रम ऐकवणे. |
| | ३. | पोस्टातील संवाद, शेतीविषयक संवाद, बसस्थानकावरील संवाद या स्वरूपाचे संवाद ऐकण्याची संधी देणे. |
| १.५.३ | १. | वक्त्यांची भाषणे ऐकण्यासंबंधी सूचना देणे, तसेंच दूरदर्शन आणि आकाशवाणी यांवरील कार्यक्रम ऐकवण्यापूर्वी सूचना देणे. |
| | २. | वाचन, वक्तृत्व, नाट्यवाचन, काव्यवाचन, काव्यगायन, पाठांतर, कवायत इत्यादी आयोजित करणे व त्या संदर्भात सूचना देऊन त्यांचे पालन करवून घेणे. |
| २.५.१ | १. | कथाकथन, आयत्या वेळेचे भाषण इत्यादी उपक्रमांचे आयोजन करणे व बोलण्याची संधी देणे. |
| | २. | नामवंत वक्त्यांची भाषणे ऐकवणे. |
| | ३. | ध्वनिफितीवरील भाषणे ऐकवून त्यांवर चर्चा घडवून आणणे. |
| २.५.२ | १. | दिलेल्या विषयावर किमान १-२ मिनिटे बोलण्याची संधी देणे. |
| २.५.३ | १. | पाठ्यपुस्तकात वर्णन केलेल्या प्रसंगांचे व घटनांचे वर्णन वाचून घेणे. तसेच वर्गातील, शाळेतील व परिसरातील घटनांचे वर्णन करून घेणे. |
| | २. | दैनंदिन जीवनातील प्रसंगांचे वर्णन करवून घेणे. उदाहरणार्थ - (१) पाहुण्यांचे आगमन, (२) पावसात भिजणे, (३) भातुकलीचा खेळ. |

| अध्ययन क्षमता क्रमांक | अध्ययन अनुभव / उपक्रम |
| --- | --- |
| २.५.४ | १. बालनाट्य, काव्यवाचन, पोवाडा गायन, चुटके सांगणे इत्यादी उपक्रमांचे शालेय समारंभात आयोजन करणे; या उपक्रमांत भाग घेण्यास उद्युक्त करणे.<br>२. संवादात, बालनाट्यात भाग घेण्यासाठी विद्यार्थ्यांना सराव देणे.<br>३. औपचारिक निवेदन करण्याचा सराव देणे. |
| ३.५.१ | १. घर, शेत, शाळा, गाव, लोकसंख्यादर्शक सुलभ आकृत्या, तक्ते आणि नकाशे यांचे वाचन करण्याचा सराव देणे. त्यासाठी पाठ्यपुस्तकाबरोबर इतर साहित्याचा उपयोग करणे.<br>२. पाठ्यपुस्तकातील चित्रांचे व आकृत्यांचे वाचन करवून घेणे. |
| ३.५.२ | १. पाठ्यपुस्तकातील उतारे व कविता यांच्या मूक वाचनासाठी सराव देणे.<br>२. हस्तलिखित गोष्टी, कविता वाचून घेणे. |
| ३.५.३ | १. शालेय परिपाठात बातम्यांचे वाचन करवून घेणे.<br>२. हस्तलिखित गोष्टी, कविता वाचून घेणे. |
| ४.५.१ | १. सुलेखन करून घेणे.<br>२. शिक्षकाने फलकावर सुवाच्य अक्षरांत लेखन करून दाखवणे.<br>३. योग्य अंतर ठेवून योग्य पद्धतीने लिहिण्यासंबंधी मार्गदर्शन करणे.<br>४. विद्यार्थ्यांना योग्य गतीने लेखन करता यावे यासाठी श्रुतलेखनाचा सराव देणे. |
| ४.५.२ | १. विरामचिन्हांची संख्या, नावे, लेखनात त्यांचा योग्य जागी वापर व वापर करण्याची पद्धती यांबाबत माहिती देणे.<br>२. चिन्हांचा अर्थ समजून देणे. |
| ४.५.३ | १. कौटुंबिक पत्राचा मायना, मजकूर, शेवट व पत्ता लिहून घेणे.<br>२. निबंधांचे वाचन करून दाखवणे.<br>३. निबंध विषयांवर चर्चा घडवून आणणे.<br>४. निबंध स्पर्धा आयोजित करणे. |

| अध्ययन क्षमता क्रमांक | अध्ययन अनुभव / उपक्रम |
|---|---|
| ५.५.१ | १. विचारास चालना देणारे परिच्छेद वाचून दाखवणे व त्यांवर आधारित कार्यकारणभावदर्शक प्रश्न विचारणे.<br>२. परिच्छेद मुलांना गटवार वाचण्यास देणे व त्यावर प्रश्न विचारण्यास सांगणे.<br>३. जुन्या पाठ्यपुस्तकातील परिच्छेद ऐकवणे / वाचावयास देणे व त्यावरून अनुमान काढण्याचा सराव देणे. |
| ५.५.२ | १. शिक्षकाने पाठ्यभागाचे / पाठ्येतर निवडक उताऱ्यांचे वाचन करून त्यावर प्रश्न विचारणे.<br>२. ध्वनिमुद्रित पाठ्यभाग / पाठ्येतर भाग ऐकवणे व त्यावर प्रश्न विचारणे.<br>३. गटात विद्यार्थ्यांनी पाठ्यभाग / पाठ्येतर भाग वाचून त्यावर एकमेकांना प्रश्न विचारणे. |
| ६.५.१ | १. शब्दांच्या जातींचा वापर असलेले वाक्यतक्ते तयार करणे.<br>२. शब्दांच्या जातींचा वापर उदाहरणांसह स्पष्ट करणे.<br>३. शब्दपत्ते वापरून वाक्यरचना करवून घेणे. |
| ७.५.१ | १. पाठ्यपुस्तकातील काही निवडक शब्दांचे पत्ते तयार करून त्यांची वर्णमालेनुसार क्रमवारी विद्यार्थ्यांकडून लावून घेणे.<br>२. शब्दकोशाचा उपयोग करण्यास विद्यार्थ्यांना उद्युक्त करणे. |
| ८.५.१ | १. पालकांशी संपर्क साधून विद्यार्थी भाषेच्या कौशल्याचा व्यावहारिक जीवनात वापर करतात का, याची माहिती घेणे.<br>२. दैनंदिन जीवनामधील प्रसंगावर वर्गात रोलप्ले पद्धतीने मुलांना त्या प्रसंगामधील विविध भूमिका करावयास लावणे. |
| ९.५.१ | १. विद्यार्थ्यांना त्यांच्या वयास अनुरूप अशी पुस्तके वाचण्यासाठी उपलब्ध करून देणे व नवे शब्द संकलित करावयास प्रोत्साहन देणे. |

# अनुक्रमणिका

*** प्रथमावृत्तीत असलेला 'फेड' हा बारावा पाठ काही तांत्रिक कारणामुळे वगळण्यात आला आहे.**

# १. कलाकार आणि राजा

**लेखक : हेमंत गोखले**

**पाठपरिचय :** खऱ्या कलावंताला आपल्या गर्विष्ठपणामुळे राजाच्या चतुरपणापुढे कशी हार पत्करावी लागते, हे या पाठात सांगितले आहे. स्तुतीने मोहित होणे, निंदेने विचलित होणे हे दुर्गुण प्रगतीला बाधक असतात. अहंकाराचा त्याग करून कलेची साधना केल्याशिवाय कोणतीही कला पूर्णत्वास जात नाही, ही शिकवण प्रत्येक विद्यार्थ्याने आत्मसात करण्यासारखी आहे.

खूप वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. अभिजित हा एक जातिवंत मूर्तिकार होता. त्याने बनवलेल्या मूर्ती म्हणजे जणू सजीव माणसेच वाटत. आपल्याशी त्या बोलत आहेत, असाच पाहणाऱ्याला भास होत असे. त्याच्या कलेची कीर्ती दूरवर पसरलेली होती. त्याच्या मनमोहक मूर्ती पाहून लोक आश्चर्याने थक्क होत. राजा बुद्धिसेनच्या कानावर अभिजितची ख्याती गेली. त्याने आपल्या प्रधानाला बोलावून अभिजितकडून राजदरबारात ठेवण्यासाठी काही मूर्ती तयार करून घेण्यास सांगितले.

प्रधान राजास विनयपूर्वक म्हणाला, "महाराज, क्षमा असावी. अभिजितसारखा दुसरा श्रेष्ठ कलाकार नाही. त्याची प्रतिभा असामान्य आहे; परंतु तो अत्यंत स्वाभिमानी असून कोणाच्याही बोलावण्यावरून तो जात नाही, की सांगण्यावरून काम करत नाही. आपल्या मूर्तींच्या विश्वात तो मश्गूल असतो."

"तुम्ही त्याला माझा निरोप सांगा. तो नक्की येईल." बुद्धिसेनाने प्रधानास सांगितले.

राजाचा निरोप घेऊन अभिजितकडे खास दूत पाठवण्यात आला,

३.५.२/४.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ७.५.१, ९.५.१

पण अभिजितने राजाच्या दरबारात येण्यास साफ नकार दिला. राजा बुद्धिसेनला ते कळताच तो दूतास म्हणाला, ''अभिजितकडे परत जा व त्याला सांग, की तू राजाचा अपमान करत आहेस. ताबडतोब दरबारात हजर हो. नाहीतर तुला कैद केलं जाईल.''

दूत राजाचा निरोप घेऊन परत अभिजितकडे गेला. त्याचा निरोप ऐकल्यानंतर अभिजितने उलट निरोप धाडला - ''मी तर तसाही माझ्या कलागृहात बंदिवानच आहे. येथे काय नि तेथे काय ! तुझ्या राजाला एवढंच सांग, की येथे येऊन त्यानं मला पाहताक्षणी ओळखावं आणि कैदी म्हणून पकडून न्यावं. तसं करण्यात तो यशस्वी झालाच, तर मी त्याच्या चरणाचा दास होईन. त्याची वाटेल ती आज्ञा पाळीन.''

दूताने राजास कलाकाराचा निरोप अगदी जसाचा तसा सांगितला. राजा मोठ्या विचारात पडला. त्याने ठरवले, की आपण स्वतःच अभिजितला एके दिवशी बंदिवान करून आणायचे. तसा राजाने त्याच्याकडे स्वतः येत असल्याचा निरोप धाडला.

काही दिवसांनी दूताकरवी निरोप पाठवून राजा बुद्धिसेन रथात बसून अभिजितच्या घरी आला. अभिजितच्या दिवाणखान्यात प्रवेश करताच तो दिङ्मूढ झाला. तिथे एक नाही तर अनेक अभिजित उभे होते. अभिजितने मधल्या काळात आपल्या स्वतःच्या अनेक मूर्ती बनवल्या होत्या. राजा भेटायला आला, तेव्हा तो स्वतः त्या मूर्तींमध्ये मूर्तीसारखा उभा राहिला. त्यातला खरा अभिजित कोण हे ओळखणे राजाला अशक्य झाले. त्या मूर्ती इतक्या एकसारख्या आणि सजीव असल्यासारख्या वाटत होत्या; त्यामुळे राजाची पंचाईत झाली. मनातल्या मनात कलाकाराच्या चातुर्याची व कौशल्याची तारीफ करत राजा काही क्षण गप्प राहिला. नंतर थोडा विचार करून तो धीरगंभीर नि स्तुतिपर आवाजात म्हणाला, ''किती सुंदर आहेत या मूर्ती ! या मूर्ती बनवणारा कलाकारही केवढा असामान्य व



अद्‌वितीय असला पाहिजे. माझ्याच काय; पण कोणाच्याच पाहण्यात अजून एवढा महान शिल्पकार आला नसेल व पुढेही येणार नाही.''

हे ऐकताच मूर्तींमध्ये उभा असलेल्या अभिजितच्या डोळ्यांत विशेष चमक आली. राजाच्या चाणाक्ष नजरेतून ती सुटली नाही. हाच तो खरा अभिजित असावा हे राजाने बरोबर ताडले. थोडे थांबून राजा म्हणाला, ''परंतु या मूर्तींच्या कलाकारामध्ये एक उणीव आहे खरी.''

''कोणती उणीव जाणवते, राजन ?'' असे उद्‌गार काढून अभिजित पटकन पुढे आला. राजाने तत्क्षणी त्याचे मनगट पकडले व त्याला कैद करत तो उद्‌गारला, ''स्तुतीने तू मोहित होतोस, तर निंदेने विचलित होतोस, हीच तुझी उणीव आहे अभिजित. समजलास ! अजून तू अहंकारी आहेस. स्तुतिनिंदेच्या मोहातून मुक्त झालेला नाहीस.''

अभिजितने लज्जित होऊन मान खाली घातली व तो राजास म्हणाला, "क्षमा असावी महाराज. मी हरलो. मी दरबारात येऊन आपण सांगाल त्याप्रमाणे मूर्ती करून देण्यास तयार आहे."

"नाही ! अभिजित, नाही !! अहंकाराचा नाश करून कलेची साधना कर, म्हणजे ती परिपूर्ण होईल. आपण स्तुती व निंदा यांच्या पलीकडे गेलो आहोत, असे तुला जेव्हा वाटेल तेव्हाच तू दरबारात ये." राजा बुद्धिसेन अगदी सहजपणे म्हणाला आणि बघता बघता रथात बसून परत निघूनही गेला.

रथात बसून परत जाणाऱ्या राजाकडे अभिजित बघतच राहिला. क्षणभर तो स्तब्ध झाला.

(९.५.१)

**मनमोहक** - सुंदर, मनाला मोहवणारे

**मश्गूल असणे** - गुंग असणे, तल्लीन असणे

**तारीफ** - स्तुती

**चाणाक्ष** - अतिशय बुद्धिमान

**तत्क्षणी** - त्याचवेळी

**ख्याती** - प्रसिद्धी, कीर्ती

**दिङ्मूढ होणे** - एखाद्या प्रसंगी काय करावे ते न समजणे

**ताडले** - ओळखले

**अद्वितीय** - ज्यासारखा दुसरा नाही तो

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) अभिजितने बनवलेल्या मूर्ती पाहून पाहणाऱ्यास कोणता भास होत असे ?

(ब) राजा बुद्धिसेनाने प्रधानाला कोणते काम सांगितले ?

(क) अभिजितच्या खोलीत प्रवेश करताच राजा दिङ्मूढ का झाला ?

(ड) अभिजितची कला केव्हा परिपूर्ण होईल, असे राजाने सांगितले ?

(इ) राजाचे कोणते गुण या पाठात दिसून येतात ?

२. **खालील प्रश्नांची तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) अभिजितविषयी प्रधानाने राजाला काय सांगितले ?

(ब) अभिजितने दूताबरोबर राजाला कोणता उलट निरोप पाठवला ?

(क) राजाने मूर्तींमधून अभिजितला कसे ओळखले ?

(ड) अभिजितमध्ये कोणती उणीव आहे, असे राजाने सांगितले ?

३. **पाठातील शब्द शोधून खालील वाक्ये पूर्ण करा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) आपल्या मूर्तींच्या विश्वात तो ............... असतो.

(ब) अभिजितची प्रतिभा ............... आहे.

(क) अभिजितच्या ............... मूर्ती पाहून लोक आश्चर्याने थक्क होत.

(ड) मी तर तसाही माझ्या ............... बंदिवान आहे.

(इ) मनातल्या मनात कलाकाराच्या ............... व ............... तारीफ करत राजा काही क्षण गप्प राहिला.

४. **कोण, कोणास व केव्हा म्हणाले ते सांगा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) "किती सुंदर आहेत या मूर्ती !"

(ब) "कोणती उणीव जाणवते, राजन ?"

(क) "आपल्या मूर्तींच्या विश्वात तो मश्गूल असतो."

(ड) "अहंकाराचा नाश करून कलेची साधना कर, म्हणजे ती परिपूर्ण होईल."

५. **खालील शब्दांमधून समानार्थी शब्द शोधून त्यांच्या जोड्या जुळवा.** (९.५.१)

कैद, मनमोहक, तारीफ, विनयाने, मश्गूल, स्तुती, गुंग, कीर्ती. नम्रपणे, ख्याती, सुंदर, बंदिवान.

६. **खालील शब्दांचा वर्णमालेनुसार क्रम लावून तुमच्या शब्दांत उपयोग करा.** (७.५.१, ८.५.१, ९.५.१)

| | | | |
|---|---|---|---|
| ख्याती, | प्रतिभा, | मश्गूल, | बंदिवान, |
| दिवाणखाना, | मती, | तारीफ, | चाणाक्ष. |

७. **मूर्ती शब्दाला 'कार' हा प्रत्यय लावून 'मूर्तिकार' शब्द बनला आहे. यासारखे पाच शब्द तयार करा.** (९.५.१)

## उपक्रम

- अभिजितला कैद न करताच राजा निघून गेला तेव्हा अभिजितच्या मनात कोणते विचार आले असतील, ते तुमच्या कल्पनेने लिहा. (४.५.३, ५.५.१)
- विविध कलाक्षेत्रांतील कलाकारांची माहिती शिक्षकांकडून मिळवा.
- खालील विधाने वाचून ती बोलणाऱ्या व्यक्तीच्या स्वभावाचा कोणता विशेष गुण लक्षात येतो, हे शिक्षकांच्या मदतीने किंवा मित्रांशी चर्चा करून लिहा. (५.५.१)

(१) तुम्ही त्याला माझा निरोप सांगा. तो नक्की येईल.

(२) येथे काय नि तेथे काय माझ्यात फरक पडत नाही, तेव्हा मी राजदरबारी येत नाही.

(३) या मूर्ती बनवणारा कलाकारही केवढा असामान्य व अद्‌वितीय असला पाहिजे.

(४) मी दरबारात येऊन आपण सांगाल त्याप्रमाणे मूर्ती करून देण्यास तयार आहे.

- मातीपासून तुम्हांला आवडतील त्या वस्तू बनवून त्यांचे छोटेसे प्रदर्शन वर्गात भरवा.

**व्याकरण :** (६.५.१)

**■ नामांचे प्रकार**

मागील इयत्तेत आपण नाम म्हणजे काय, याविषयीची माहिती घेतलेली आहे. आता आपण नामांचे प्रकार पाहू.

खाली दिलेली वाक्ये वाचा.

(१) गोदावरी ही एक मोठी नदी आहे.

(२) हिमालय हा उंच पर्वत आहे.

(३) कुसुम ही माझ्या मित्राची मुलगी आहे.

वरील वाक्यांत गोदावरी, नदी, हिमालय, पर्वत, कुसुम, मुलगी ही नामे आहेत. ही त्या त्या वस्तूंना दिलेली नावे आहेत. पण ही सर्वच नामे एकाच प्रकारची नाहीत. पहिल्या वाक्यातील 'नदी' हा शब्द त्या जातीच्या

कोणत्याही वस्तूला उद्देशून योजता येतो; पण 'गोदावरी' हे एका ठरावीक नदीला दिलेले नाव आहे. 'पर्वत' हा शब्द त्या जातीच्या कोणत्याही वस्तूला लावता येतो; पण 'हिमालय' हा शब्द एकाच पर्वताला लावता येतो. ते त्याचे स्वतःचे नाव आहे. 'मुलगी' हा शब्द कोणत्याही मुलीला उद्देशून वापरता येईल; पण 'कुसुम' हे एका मुलीचे स्वतःचे नाव. अशा प्रकारे नदी, पर्वत, मुलगी ही जातिवाचक नावे आहेत. त्या जातीतील कोणत्याही वस्तूला किंवा व्यक्तीला ती लावता येतात. त्या जातीतील सर्व पदार्थांमध्ये काही सारखेपणा असतो किंवा त्यात काही समान गुणधर्म असतात. म्हणून **एकाच जातीच्या पदार्थांतील सारखेपणामुळे जे सर्वसाधारण नाव दिले जाते, त्याला 'सामान्यनाम' असे म्हणतात.**

वरील वाक्यांतील नदी, पर्वत व मुलगी ही सामान्यनामे होत.

वरील वाक्यांतील 'गोदावरी', 'हिमालय', 'कुसुम' ही त्या त्या ठरावीक वस्तूंना दिलेली नावे आहेत. गोदावरी हे सर्व नद्यांचे नाव नव्हे; एका विशिष्ट नदीचे ते नाव आहे. 'हिमालय' याचा अर्थ 'हिमाचे आलय' म्हणजे बर्फाचे घर किंवा साठा. बर्फ ज्यावर पडते अशा सर्व पर्वतांना आपण 'हिमालय' म्हणत नाही. ते एकाच पर्वताला खुणेकरिता दिलेले नाव आहे. तसेच 'कुसुम' हे सर्व मुलींना दिलेले नाव नव्हे. एका विशिष्ट मुलीचे ते नाव आहे. ही नावे त्या जातीतील सर्वांना दिलेली नसून काही ठरावीक वस्तूंना किंवा व्यक्तींना दिलेली आहेत. **यांना विशेषनामे म्हणतात.** सामान्यनाम हे **जातिवाचक** किंवा **गटवाचक** नाव असते, तर विशेषनाम हे **व्यक्तिवाचक** नाव असते.

आता खालील वाक्ये पाहा.

(१) साखरेत गोडी असते.

(२) प्रामाणिकपणा हा कुत्र्याचा गुण आहे.

(३) कोल्ह्याचा धूर्तपणा कोकराने ओळखला.

यांतील गोडी, प्रामाणिकपणा, धूर्तपणा हीदेखील नावे आहेत. पण ती वस्तू किंवा प्राणी यांची नावे नसून त्या त्या वस्तूतील किंवा प्राण्यातील गुणधर्मांना दिलेली नावे आहेत.

साखर गोड असते. गोड असणे हा साखरेचा गुण. साखरेच्या या गुणाला 'गोडी' हे नाव दिले आहे. कुत्रा हा प्रामाणिक असतो. प्रामाणिक असणे हा कुत्र्याचा गुण. या गुणाला 'प्रामाणिकपणा' असे नाव दिले आहे. कोल्हा हा धूर्त असतो. धूर्त असणे हा कोल्ह्याचा गुण. 'धूर्तपणा' हे त्या गुणाला दिलेले नाव आहे. गुण किंवा धर्म यालाच 'भाव' असे व्याकरणात म्हटले जाते. गोडी, प्रामाणिकपणा, धूर्तपणा **यांना भाववाचक नामे** असे म्हणतात.

नामांचे मुख्य प्रकार तीन आहेत :

(१) सामान्यनाम, (२) विशेषनाम व (३) भाववाचक नाम.

## अभ्यास (६.५.१)

**(१) पुढील वाक्यांतील नामे ओळखून ती कोणत्या प्रकारची आहेत ते सांगा.**

(अ) राजा बुद्‌धिसेन अभिजितच्या घरी आला.

(आ) किती सुंदर आहेत या मूर्ती !

(इ) अभिजितच्या डोळ्यांत विशेष चमक आली.

**(२) पुढील नामांचा प्रकार सांगून ती वाक्यांत वापरा.**

पत्र, ग्यानबा, शहाणपणा, दुष्टपणा, विमाने, जिजाई.

**वाचा आणि लक्षात ठेवा.**

एक अक्षरी कोणताही शब्द नेहमी दीर्घच लिहिलेला असतो.

उदा. मी, ती, ही, जी, तू, की, बी, पी, फी.

अपवाद - 'आणि' या अर्थाने वापरला जाणारा शब्द 'नि'.

# २. पाऊस

**पाठपरिचय :** हे एक प्राचीन ओवीबद्ध लोकगीत आहे. या काव्याचा रचयिता कोण, याचे नेमके उत्तर देता येणार नाही. पूर्वी जात्यावर दळण दळताना वा अन्य कामे करत असताना स्त्रिया गाणी गात असत. ती गाणी परंपरेने मुखोद्गत करून ठेवलेली असल्याने, ती वाङ्मयरूपाने आजही अस्तित्वात आहेत. अनेक लोकांनी निर्मिलेली आणि जतन केलेली गीते म्हणून ती 'लोकगीते' होत.

प्रस्तुत लोकगीतातल्या ओव्यांमध्ये लेकुरवाळ्या स्त्रीने मुसळधार कोसळणारा पाऊस आणि त्याचे दृश्य परिणाम यांचे वर्णन केले आहे. पाऊस काही थांबत नाही. कडेवर पदराखाली तान्हे बाळ आहे. त्याचीच काळजी तिला लागली आहे. अशा रीतीने एका स्त्रीमनातल्या भावभावनांचे दर्शन या ओव्यांत घडते.

पाऊस पडतो । पडतो मुसळधार
गंगेला आला पूर । दोन्ही थडी ॥ १ ॥
पाऊस पडतो । गरजे पाणी पडे
आकाश जणु रडे । रात्रंदिवस ॥ २ ॥
पाऊस पडतो । पडतो सारखा
सूर्य जालासे पारखा । चार दिवस ॥ ३ ॥
पाऊस पडतो । विजांचा चमचमाट
धरणीमाता हिरवा थाट । मांडीतसे ॥ ४ ॥
मेघ गडगडे । कडाडते वीज
कुशीमध्ये नीज । तान्ह्या बाळा ॥ ५ ॥
झाडे झडाडती । विजा कडाडती
धरणीमाये तुझा पती । येत आहे ॥ ६ ॥

३.५.२/४.५.३, ५.५.१, ५.५.२, ७.५.१, ९.५.१

मेघ गरजतो । पाऊस वर्षतो
कुशीत निजतो । तान्हा बाळ ॥ ७ ॥
पाऊस थांबेना । राऊळी कशी जाऊ
त्रिदळ कसे वाहू । शंकराला ॥ ८ ॥
पाऊस थांबेना । देउळी कशी जाऊं
बाळाला कशी नेऊ । कडेवरी ॥ ९ ॥
पाऊस थांबेना । पाखरे गारठली
आईच्या पदराखाली । तान्हा बाळ ॥ १० ॥
पाणी पाणी झाले । साऱ्या अंगणात
नको जाऊ तू पाण्यात । तान्ह्या बाळा ॥ ११ ॥

(९.५.१)

**थडी** - काठी
**राऊळ** - देऊळ
**पारखा होणे** - दुरावणे
**त्रिदल (ळ)** - बेलपत्र

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) आकाश रडत आहे असे केव्हा वाटते ?
(ब) पावसाळ्यात सूर्य आपल्याला पारखा का होतो ?
(क) धरणीने मांडलेला हिरवा थाट कोणता ?
(ड) धरणीचा पती कोण ?
(इ) बाळाच्या आईला देवळात कशासाठी जायचे आहे ?
(फ) बाळाची आई बाळाला शेवटी काय बजावून सांगत आहे ?

२. **कोण ते सांगा.** (९.५.१, ५.५.२)
मुसळधार पडणारा, चमचम करणारी, हिरवा थाट मांडलेली, गडगड आवाज करणारा, कडाडणारी.

३. **खालील अर्थ असणाऱ्या कवितेतील ओळी सांगा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) नदीला खूप पाणी आले आहे.

(ब) सगळीकडे पावसाचे पाणी पसरले आहे.

४. **खालील वाक्यांतील मोकळ्या जागी कंसांतील योग्य शब्द भरा.** (५.५.१)

(अ) ढगांमुळे सूर्य पृथ्वीला जणू काही ................... झाला आहे.
(अदृश्य/पारखा/निस्तेज)

(ब) सतत पडणाऱ्या पावसामुळे बाळाच्या आईला ................ पान शंकराला वाहायला जाता येईना.
(पिंपळाचे/वडाचे/बेलाचे)

(क) बाळ आईच्या ................ झोपले आहे.
(कुशीत/शेजारी/मांडीवर)

५. **खालील शब्दांचे समानार्थी दोन दोन शब्द सांगून त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१, ९.५.१)

मेघ, पाणी, सूर्य,
धरणी, देऊळ.

## उपक्रम

- **'खूप दिवस वाट पाहूनही पाऊस पडत नाही, म्हणून सर्वांना खूप त्रास होत आहे', अशी कल्पना करून त्या परिस्थितीचे पंधरा ओळींत वर्णन लिहा.** (४.५.३)
- **'पाऊस' या विषयावरील कवितांचा व चित्रांचा संग्रह करा.**



# ३. आचार्य प्रफुल्लचंद्र राय

**लेखक : डॉ. मिरदेव गायकवाड**

**पाठपरिचय :** भारतात औषधांचा पहिला कारखाना काढणारे भारतीय संशोधक, शास्त्रज्ञ प्रफुल्लचंद्र राय यांच्या जीवनकार्याचा परिचय या पाठात करून दिला आहे. विज्ञाननिष्ठा, देशभक्ती, समाजसेवा, सतत कार्यक्षमता, वाचन इत्यादी मूल्ये या पाठातून मुलांवर संस्कारित करता येतात.



सकाळचे आठ वाजले होते. बेलापुरे गुरुजी मुलांना शिकवत होते. मुलेही मन लावून त्यांचे बोलणे ऐकत होती.

तेवढ्यात रस्त्यावरून जाणाऱ्या बैलगाडीचा धडधड आवाज आला. सर्व मुलांनी त्या दिशेने पाहिले. तेव्हा गाडीत त्यांना एक अजब दृश्य दिसले. मार्चचा महिना असल्याने प्रचंड उकाडा जाणवत होता आणि बैलगाडीत बसलेल्या माणसाने मात्र अंगाभोवती कांबळे घट्ट लपेटले होते. मुलांनी आश्चर्याने विचारले, ''गुरुजी, त्या माणसाला उकडत नाही का ?''

''हो, त्याला उकडत नाही.'' गुरुजी म्हणाले.

''ते कसे काय ?'' प्रताप म्हणाला.

''तुझी शंका बरोबर आहे. तो आजारी आहे.''

३.५.२/५.५.१, ५.५.२, ६.५.१, ९.५.१

“आजारी माणसाला थंडी वाजते ?” सचिन.

“आजार वेगवेगळे असतात. कोणाला थंडीच्या दिवसांतही ताप येतो, तर कोणाला उन्हाळ्यातही थंडी वाजते. एक ना दोन, अनेक !” गुरुजी.

“मग आता कुठे नेताहेत त्याला ?” प्रवीण.

“दवाखान्यात, औषधोपचार करायला.” गुरुजी पुढे म्हणाले, “मुलांनो, आपल्या शास्त्रज्ञांनी माणसांवर खूप उपकार करून ठेवले आहेत. तुम्हांला सर्दी झाली, ताप आला, तर तुम्ही बरे होण्यासाठी गोळी खाता. हे औषध भारतात पहिल्या प्रथम कोणी निर्माण केले माहीत आहे ?”

भारतात औषधांचा पहिला कारखाना काढणारा भारतीय माणूस म्हणजे आचार्य प्रफुल्लचंद्र राय. त्याआधी सगळी औषधे विदेशातून येत; परंतु प्रफुल्लचंद्रांनी स्वतः आपल्या देशात औषधे तयार केली आणि अनेकांना काम तर दिलेच, शिवाय अनेकांचे प्राणही वाचवले. भारतासारख्या गरीब देशातील लोकांना परवडणारी औषधे त्यांनीच निर्माण केली. असे हे बंगालमधील फार मोठे शास्त्रज्ञ आणि समाजसेवक होते, तसेच ते साहित्यिकही होते. त्यांचा ‘हिस्टरी ऑफ हिंदू केमिस्ट्री’ हा एक अजोड ग्रंथ आहे.

प्रफुल्लचंद्रांचा जन्म २ ऑगस्ट, १८६१ रोजी खुलना जिल्ह्यातील राहुली काटिवाडा या गावात झाला. खुलना हा जिल्हा बांगलादेशात आहे.

प्रफुल्लचंद्रांना लहानपणापासूनच वाचनाचा छंद जडलेला होता. ते वाचनात इतके गुंग होऊन जात, की वाचन करत असताना अंधार केव्हा पडे हेही त्यांच्या लक्षात येत नसे.

प्रफुल्लचंद्रांच्या वडिलांचे नाव हरिश्चंद्र राय. त्यांचा पुस्तकांचा मोठा संग्रह होता. प्रफुल्लचंद्रांच्या बुद्धीला आयतेच खाद्य मिळाले. ती सर्व पुस्तके त्यांनी वाचून काढली.

प्रफुल्लचंद्रांनी कृष्णनगर महाविद्यालयात गॅलिलिओ, न्यूटन, फ्रँकलिन यांची चरित्रे वाचली. त्यांच्या चरित्रांच्या वाचनाने त्यांना विज्ञानाचे महत्त्व समजले. त्यांच्या मनात विज्ञानाची इतकी आवड निर्माण झाली, की विज्ञानाच्या उपासनेशिवाय देशाला तरणोपाय नाही हा जणू त्यांनी मंत्र बनवला.

विलायतेला जाण्याची एक संधी प्रफुल्लचंद्रांना मिळाली. अर्थातच त्यासाठी खूप कष्ट करावे लागणार होते. त्यावेळी 'गिल्ड ख्रिस्त शिष्यवृत्ती' मिळण्यासाठी संपूर्ण देशामध्ये परीक्षा होत असे. या परीक्षेत संपूर्ण देशभराच्या विद्यार्थ्यांतून जो पहिला येईल, त्यालाच ही शिष्यवृत्ती मिळत असे. प्रफुल्लचंद्र राय यांनी या परीक्षेत पहिला क्रमांक मिळवला आणि त्यांना ही शिष्यवृत्ती मिळाली, त्यामुळे ते विलायतेलाही गेले. त्यांनी एडिंबरो विद्यापीठात नाव दाखल केले. तेथे त्यांनी पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र, जीवशास्त्र यांचा कसून अभ्यास केला.

भारतात परत आल्यानंतर त्यांना एक वर्ष नोकरीविना काढावे लागले. १८८९ साली त्यांना कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्ये २५० रुपये पगारावर प्राध्यापकाची नोकरी मिळाली. ते विद्यार्थीजगतात अतिशय प्रिय होते. भान हरपून टाकणारा प्राध्यापक अशी त्यांची ख्याती होती. त्यांचे ब्रीदवाक्य होते, 'माझे विद्यार्थी हीच माझी धनदौलत !'

प्रफुल्लचंद्र राय अनेक प्रयोग करत होते. माणसाला उपयोगी पडणाऱ्या गोष्टींचा शोध घेत होते.

प्रथम त्यांनी देशाचे आर्थिक दारिद्र्य नाहीसे करण्यासाठी प्रयत्न सुरू केले. त्यासाठी पहिल्या प्रथम सुशिक्षितांची बेकारी नष्ट करण्यावर भर दिला. कारखानदारी, उद्योगधंदे यांची वाढ करण्यावर लक्ष दिले. त्यांनी आपली राहणी साधी केली. त्यातून जेवढी काटकसर करता येईल तेवढी करून पैसा जमा केला. त्यातून त्यांनी 'बेंगाल केमिकल ॲण्ड फार्मास्यूटिकल वर्क्स' नावाचा लहानसा कारखाना सुरू केला. मुंबई,

कलकत्ता, नागपूर इत्यादी ठिकाणी या कारखान्याच्या शाखा काढल्या. त्यामधून जवळ जवळ ४००० लोकांना रोजगार उपलब्ध करून दिला.

नुसता कारखाना काढून प्रश्न सुटत नाही, तर त्यामध्ये तयार होणाऱ्या औषधांनाही मान्यता मिळावी लागते. त्याशिवाय त्यांचा खप कसा होणार ? खप झाला नाही, तर कामगारांना पगार कसा देणार ? ही समस्या या कारखान्यापुढे उभी राहिली. या कारखान्यातील औषधे देशी आहेत म्हणून देशी डॉक्टरांचाही त्यावर विश्वास बसत नसे. अशाही परिस्थितीत आपल्या कामावरील निष्ठा प्रफुल्लचंद्रांनी ढळू दिली नाही. नव्या नव्या क्षेत्रांत कर्तृत्व दाखवत त्यांनी प्रवास चालू ठेवला, म्हणूनच ब्रिटिशांनी त्यांना 'सर' ही पदवी दिली.

१९२० मध्ये प्रफुल्लचंद्र राय विज्ञानपरिषदेचे अध्यक्ष झाले. तेव्हा ते म्हणाले, "आपली बुद्धी ग्रंथप्रामाण्याने कुंठित झाली आहे. विज्ञानाची भक्ती जर आपल्यात उत्पन्न झाली, तर आपण खऱ्या अर्थाने सत्यसंशोधन करू शकू." विज्ञानावर त्यांची श्रद्धा होती. त्यांचे जंतुविज्ञानासंबंधीचे पुस्तक या दृष्टीने विशेष उल्लेखनीय आहे.

प्रफुल्लचंद्रांनी विद्यार्थ्यांमध्येही विज्ञानाची आवड निर्माण केली. १९२१ मध्ये कलकत्ता विद्यापीठाने त्यांना पन्नास विद्यार्थ्यांची तुकडी देऊन परदेशी पाठवले. उच्च संशोधन कार्याबद्दल विद्यार्थ्यांना माहिती देणे हा त्यामागचा हेतू होता. देशातील तरुण ज्ञानी झाले पाहिजेत, त्याशिवाय देशाची प्रगती होणार नाही, हाच त्यांचा एकमेव विचार होता.

१९२२ साली खुलना जिल्ह्यात दुष्काळ पडला. त्यावेळी त्यांनी स्वतः हातात झोळी घेतली. गरीब जनतेसाठी अन्न, वस्त्र यांची मदत मिळवण्यासाठी ते दारोदार फिरले. अनेक ठिकाणी त्यांनी दुष्काळी लोकांसाठी मदतकेंद्रे सुरू केली. त्यांच्या या संघटन कार्याबद्दल ब्रिटिश सरकारलाही अचंबा वाटला.

त्याचवेळी बंगालमध्ये अतिवृष्टीचाही तडाखा बसला. कित्येक मैलांचा परिसर पाण्याखाली बुडाला. लोक बेघर झाले. त्यांच्या मदतीसाठी प्रफुल्लचंद्रांनी 'बंगाल रिलीफ सोसायटी'ची स्थापना केली. विज्ञानातील गूढ सत्याची उकल करत असतानाच हा ज्ञानयोगी समाजसेवकही बनला होता.

असा हा सदा कार्यरत असणारा विज्ञानयोगी, समाजसेवक, देशभक्त, हाडाचा शिक्षक दिनांक २६ जून, १९४४ रोजी मृत्यू पावला.

(९.५.१)

**कांबळे** - घोंगडी

**अजोड** - ज्यासारखा दुसरा नाही असा

**ग्रंथप्रामाण्य** - जे ग्रंथात लिहून ठेवलेले असते, त्यालाच सत्य मानणे.

**अचंबा वाटणे** - आश्चर्य, नवल

**कसून अभ्यास करणे** - खूप अभ्यास करणे

**बुद्धी कुंठित होणे** - विचारचक्र थांबणे

**अतिवृष्टीचा तडाखा** - एखाद्या वर्षी आवश्यकतेपेक्षा जास्त पाऊस पडतो; तेव्हा धान्य पिकत नाही, लोकवस्ती पाण्याखाली बुडते, नद्यांना महापूर येऊन घरे वाहून जातात, जीवित हानी, वित्त हानी होते. याला ओला दुष्काळ पडणे असेही म्हणतात.

**विदेश** - दुसरा देश, परदेश

**विलायत** - परदेश

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) प्रफुल्लचंद्र राय यांना लहानपणापासून कोणता छंद जडला होता ?

(ब) कृष्णनगर महाविद्यालयात त्यांनी कोणाकोणाची चरित्रे वाचली ?

(क) प्रफुल्लचंद्र राय यांचे ब्रीद वाक्य कोणते होते ?

(ड) ब्रिटीशांनी प्रफुल्लचंद्र राय यांना कोणती पदवी दिली ?

**२. खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) प्रफुल्लचंद्र राय यांनी पहिला औषधांचा कारखाना कोणत्या उद्देशाने काढला ?

(ब) प्रफुल्लचंद्र राय यांच्या मनात विज्ञानाची आवड कशी निर्माण झाली ?

(क) एडिंबरो विद्यापीठात नाव दाखल करण्यासाठी राय यांना काय करावे लागले ?

(ड) प्रफुल्लचंद्र राय यांचे संघटन कौशल्य केव्हा दिसून आले ?

**३. गाळलेल्या जागी पाठातील योग्य शब्द भरा.** (५.५.१, ५.५.२)

(१) भारतात औषधांचा पहिला कारखाना काढणारा भारतीय माणूस म्हणजे .............. होय.

(२) विलायतेत त्यांनी .............. विद्यापीठात नाव दाखल केले.

(३) विज्ञानाच्या उपासनेशिवाय देशाला .................. नाही हा जणू त्यांनी मंत्र बनवला.

(४) बंगालमधील दुष्काळी लोकांसाठी त्यांनी ................ ची स्थापना केली.

(५) आपली बुद्धी ............ ने कुंठीत झाली आहे.

## उपक्रम

- **भारतीय शास्त्रज्ञांची चरित्रे मिळवून वाचा.** (३.५.३)
- **विविध क्षेत्रांत लोकोपयोगी कार्य करणाऱ्या भारतीय महापुरुषांची माहिती मिळवा. त्यांच्या चित्रांचा संग्रह करा.**

**व्याकरण :** (६.५.१)

## विशेषणाचे प्रकार

नामाबद्दल अधिक माहिती सांगणाऱ्या शब्दांना 'विशेषण' असे म्हणतात, हे आपण मागल्या वर्षी शिकलो. आता आपण विशेषणांचे प्रकार पाहू.

खालील उदाहरणे पाहा :

हुशार मुलगा, देखणी मुलगी, पांढरा ढग, कडू कारले, गोड आंबा, हिरवे रान

हुशार, देखणी, पांढरा, कडू, गोड, हिरवे हे वरील शब्द त्या त्या शब्दांपुढे येणाऱ्या नामांबद्दल विशेष माहिती सांगतात. ही सर्व विशेषणे आहेत.

**(१) गुणविशेषण :**

आता ही कोणती विशेष माहिती सांगतात ते पाहू.

खालील शब्द पाहा :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| हुशार मुलगा | : | मुलगा कसा आहे ? | – | हुशार |
| कडू कारले | : | कारले कसे आहे ? | – | कडू |
| गोड आंबा | : | आंबा कसा आहे ? | – | गोड |

हुशार, कडू, गोड ही विशेषणे त्यांच्यापुढे येणारी नामे कशा प्रकारची आहेत हे सांगतात. म्हणजेच त्या त्या नामांचे ते गुण दाखवतात.

**नामांचे गुण किंवा विशेष दाखवणाऱ्या विशेषणांना 'गुणविशेषणे' म्हणतात.**

आणखी काही उदाहरणे –

चंदेरी रात्र, मखमली पडदा, आंबट द्राक्षे, तरुण माणसे.



# ४. भाकरीचं झाड

**लेखक : आनंद यादव**

**पाठपरिचय :** शहरी वातावरणात वाढलेल्या आपल्या मुलीला एका छोट्या टबातल्या मातीत जोंधळा पेरून शेतीचे छोटे रूप दाखवणारे लेखक आणि जोंधळ्याच्या पिकाला भाकरीचं झाड म्हणून संबोधणारी भाबडी मुलगी यांच्यातल्या भावरूपाचे दर्शन या पाठातून घडते. 'सोता मळलेल्या जुंधळ्याची एकतरी भाकरी वर्सातनं एकदा तरी खाईत जा...' ही मातीची आर्त हाक मनाला चटका लावून जाते.

घरातील जोंधळे संपले होते, म्हणून एक क्विंटल जोंधळे घेतले. पिशव्यांत भरून सोप्यात नेऊन ओतले. "एवढं !" जोंधळ्याचा ढीग बघून छोट्या कीर्तीला आश्चर्य वाटलं.

जोंधळे पोत्यात भरता भरता मी तिला गावाकडच्या गोष्टी सांगितल्या. जोंधळ्याचं झाडही असतं याची तिला गंमत वाटली.

"मला ते झाड बघायचं आहे," ती म्हणाली.

"गावाकडं गेलो की तुला दाखवीन हां" माझ्या मनात एक हिरवं सोनेरी झाड चमकलं.

मेमध्ये वावटळं, वादळं उठली. पावसाळा जवळ आला. गच्चीत जुना निरुपयोगी टब होता. त्यात माती घालून त्याचा कुंडीसारखा उपयोग केला. उलथण्यानं माती मोकार केली. नखांत माती जाईपर्यंत ढेकळं हातांनी चेंगरली नि ते छोटंसं रान सपाट करून घेतलं. कीर्ती शेजारी बघत बसली होती. तिला म्हणालो,

"आता आपण यात जोंधळा लावूया हां."

"आता लगेच बिया घालायच्या ?"

३.५.२/१.५.१, ४.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ७.५.१, ८.५.१, ९.५.१

“आताच नाही. पाऊस लागू दे. ही माती पाण्यानं भिजू दे. मग जोंधळा पेरायचा.”



“तोवर कशाला वाट बघायची ? नळाचं पाणी घालूया की.”

“अहं ! तुला शेतात झाड कसं येतं ते बघायचं आहे ना ? मग त्याला नळाचं पाणी कसं घालणार ? पावसाचंच पाणी शेताला असतं.”

तिला हे काही कळलं नाही. तिनं भाबडी मान हालवली. उड्या मारत खेळायला निघून गेली. मी तिथंच बसलो नि नखांत गेलेली माती मन लावून काढू लागलो. कुठल्या तरी जुन्या आठवणी वर येऊ लागल्या.

*कुंडी पसरत पसरत माझ्यासमोर शेत होऊन राहिली. मनात एक पाऊस आला. तापून सोक पडलेली ढेकळं पाणी पिऊन मऊ झाली. त्यांना हळूहळू खाजवत त्यांच्या पाठीवर कुळव फिरवू लागलो. कुळवावर उभं राहून बैल दबवण्यात आणि शेपटीत हात घालून त्यांना पळवण्यात खूप मजा आली. पालथी पडून रानंही खुदूखुदू हसू लागली. मुहूर्त बघून पेरणी सुरू झाली.*

गप्पा मारायला आलेल्या मित्रानं गच्चीच्या दारातून हाक दिली नि मी भानावर आलो.

काही दिवसांनी कुंडीत टाकलेल्या जोंधळ्याच्या आठ-दहा दाण्यांतून कोंब वर आले. कीर्ती आनंदानं, आश्चर्यानं चेकाळली. वाड्यातल्या मैत्रिणींना दाखवू लागली.

"कशाची गं ही झाडं ?" मैत्रिणीने विचारलं.

"त्याऽ ह्याचं गं..." तिचा जीव शब्द शोधता शोधता अडमडून पडला. अचानक तिच्या ओठातून एक वाक्य बाहेर पडलं. "अगं, भाकरीचं !" जोंधळा शब्द तिला किती अवघड गेला !



पोरी झाडांना हात लावू लागल्या. कुणीतरी एक झाड अचानक हातात घेतलं. कीर्तीचा जीव खूप तळमळला. मी मुलींना ताकीद दिली.

कुंडीतल्या जोंधळ्याजवळ मी अधूनमधून रमू लागलो. जोंधळ्याचं रानच्या रान कुंडीत येऊ लागलं. त्याची खुरपण खुरप्याशिवाय करू लागलो. कोळपी नसताना कोळपी मारू लागलो. भाकरीची झाडं उदंड वाढू लागली. पोरी सारखं पाणी घालू लागल्या.

"अगं, सारखं पाणी घालू नका."

"लौकर मोठी होतील ना झाडं."

"तशी ती होत नाहीत. गारठून जातील. त्यांना पाणी लागेल."

"म्हंजे काय ?"

"म्हंजे खूपखूप पाणी झालं, की झाडं मरतात."

कीर्तीचे काळेभोर डोळे घाबरले. नेमका त्या दिवशी संध्याकाळी धो धो पाऊस आला. पाणी लागून कोमेजणारे शेंडे मनासमोर येऊ लागले.

मी कीर्तीला छातीशी घेऊन तो पाऊस दाखवू लागलो. "असा धो धो पाऊस लागला की पिकांना पाणी लागतं; मग ती पिवळी पडून मरतात."

डोळ्यांच्या पापण्याही न हालवता ती पावसाचा मार खाणाऱ्या कुंडीतल्या जोंधळ्याकडं पाहू लागली. बावरली. अबोलपणे हवालदिल झाली. तिचा चेहरा बघून मला गलबलल्यागत झालं. तिच्या बावऱ्या डोळ्यांकडं पाहत घरात जाता जाता म्हणालो, "अगं, एवढ्या पाण्यानं ही झाडं काही मरणार नाहीत, पण उद्यापासून रोज पाणी घालत जाऊ नको."

पावसाळा जवळजवळ नाहीसा झाला होता. जोंधळ्याची धाटं चांगली वाढली होती. कणसं चांगली पडणार असं वाटू लागलं. पानं चांगली लांबरुंद झाली होती. कुंडीत त्यांचा पसारा मावेनासा झालेला. येणाऱ्याजाणाऱ्याच्या अंगाला ती येताजाता स्पर्श करू लागली. जाणारेयेणारेही कुंडीत चक्क जोंधळा लावलाय;म्हणून आश्चर्य करू लागले. कुणी विनोदही केले. त्यावेळी कुठं माझ्या ध्यानात आलं, की आपण दुसऱ्या मजल्यावर शेत पिकवण्याचा प्रयत्न करत आहोत. या फुटक्या टबाच्या केविलवाण्या कुंडीत शेत येणं अशक्य आहे. तरी जोंधळा बेदरकारपणे कुंडीत डोलू लागला होता.

एक दिवस एका धाटाच्या शेंड्यावर माझी नजर खिळली. पोटरी दिसू लागली होती. माझ्या मनाला मोती लगडल्यागत झालं.

आठ-दहा दिवसांनी पोटरी उसवून हळूच कोवळं कणीस बाहेर डोकावलं. माझं बालपण वर उसळलं.

*मनातल्या मनात उठून माळ्यावरची गोफण काढून घेतली. शिवारावर पाखरांचे थिरेच्या थिरे येऊन बसू लागले. त्यांना उडवण्यासाठी बांधांच्या गवतातनं, जोंधळ्यातनं पळता पळता दहिवरानं पाय नि चड्डी भिजून ओलीचिंब झाली. तरीही हाहाऽ हूहूऽ थांबलं नाही. गोफणीत ठिसूळ ढेकळं घालून फेकू लागलो. पाऊस पडल्यागत ढेकळांची माती पानांवर वाजू लागली. तिच्या आवाजानं पाखरं उडू लागली.*

कीर्तीच्या हाकेसरशी मी भानावर आलो.



कणसं हुरड्याला आली. मुलींना हुरडा म्हणजे काय माहीत नव्हतं. त्यांना हुरडा करून द्यावा असं वाटू लागलं.

"कीर्ती, आपण उद्या सुटीच्या दिवशी या कणसांचा हुरडा करूया."

"कसा करायचा ?"

"दाखवीन ना तुला."

दूध भरलेली सात-आठ कणसं निळ्या आभाळाकडं बघत डोलतेली. त्यांना कशाचीही फिकीर नाही. एकमेकांच्या संगतीत कोंडाळं करून मजेत राहिलेली. त्यांना ठाऊक नाही की आपण एका कुंडीत आहोत; हे शेत नाही !

तीन-चार कणसं खुडल्यावर उरलेली कणसं गडबडून गेली. तीन-चार जणं गेली कुठं ? त्यांच्या त्या भुंड्या धाटांना अतोनात दुःख झालं.

दोन-तीन दिवस कामानिमित्त बाहेरगावी जाऊन आलो. दरम्यान स्मितानं – कीर्तीच्या आईने – कीर्तीच्या हट्टासाठी उरलेल्या कणसांचा हुरडा करून तिला खायला दिला. सगळी धाटं मुंडरी. माझं मन काळपट पडत गेलं.

संध्याकाळी एकांती होऊन गच्चीत बसलो. कीर्ती खेळायला गेलेली. वाटलं, ही मुंडरी धाटं कशाला ठेवायची ? काढून टाकावीत, म्हणून उठलो नि ती हातात गच्च धरून मुळांसकट उपटून टाकून दिली.

आता कुंडी भुंडी झाली होती. माती मुकाट. पोटातल्या पोटात कढ सोसणारी माती म्हणाली, "निवद दाखवून तरी जुंधळा काढायचा हुतास.

लक्ष्मी हाय ती. तुझी भाकरी. समद्याच कणसांचा हुरडा करून खाल्लास. आता फुडंला काय पेरणार ? दोन-चार कणसं जरी वाळली असती तरी त्येंचं पसाभर जुंधळं निघालं असतं. सोता मळलेल्या जुंधळ्याची एक तरी भाकरी वर्सातनं एकदा तरी खाईत जा. पोरींस्नीबी भाकरीचं झाड म्हंजे काय ते ठाऊक झालं असतं. माझ्या पोरींस्नी हे कळलं पाहिजे.''

**(या पाठातील भाषा आपण नेहमी जशी बोलतो तशीच लिहिली आहे. उदा. एकारान्त शब्दांतील शेवटच्या अक्षरावर मात्रा देण्याऐवजी शीर्षबिंदू दिलेला आहे. जसे — 'खूप खूप पाणी झालं, की झाडं मरतात.' या वाक्यातील झालं, झाडं हे शब्द लिहिताना आपण 'झाले', 'झाडे' असे लिहितो, मात्र बोलताना या शब्दांचा वेगळा उच्चार करून बोलतो. अशा शब्दांचे उच्चार मुलांना समजावून द्यावेत.)**

(९.५.१)

**माती मोकार करणे** - माती मोकळी करणे

**ढेकळ चेंगरणे - ढेकळ फोडणे**

**सोक पडणे** - कोरड पडणे

**निवद** - नैवेद्य

**चेकाळणे** - अनावर होणे, बेभान होणे

**हवालदिल होणे** - अस्वस्थ होणे

**दहिवर** - दंव

**भुंडी/मुंडरी धाटे** - कणसे छाटून काढलेली जोंधळ्याची धाटे

**गोफण** - दगड मारण्यासाठी केलेले दोरीचे, चामड्याचे एक साधन. पाखरांपासून पिकांचं रक्षण करण्यासाठी याचा वापर करतात.

**हुरडा** - ज्वारीच्या कणसांतील दाणे भरल्यानंतर ते निबर होण्याआधी कणसं भाजून खाता येतात. त्याला आपण हुरडा म्हणतो.

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) छोट्या कीर्तीला कशाचे आश्चर्य वाटले ?

(ब) कीर्तीला कशाची गंमत वाटली ?

(क) कीर्ती आनंदाने केव्हा चेकाळली ?

(ड) कीर्तीचा जीव का तळमळला ?
(इ) रोपांना सारखे पाणी घालू नका, असे वडिलांनी मुलींना का सांगितले ?
(फ) भुंड्या धाटांना कशामुळे अतोनात दुःख झाले ?

२. **खालील प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) कीर्तीच्या वडिलांनी जोंधळा पेरण्याची तयारी कशी केली ?
(ब) कुंडीत जोंधळा पेरताना त्यांना शेतातल्या कोणत्या आठवणी आल्या ?
(क) मातीने कीर्तीच्या वडिलांना काय सांगितले ?
(ड) जोंधळ्याच्या झाडाला कीर्तीने 'भाकरीचे झाड' असे का म्हटले ?
(इ) कोवळे कणीस पाहताच लेखकाच्या मनात बालपणीच्या कोणत्या आठवणी जाग्या झाल्या ?

३. **खालील शब्दसमुहांचा वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)
(अ) मनात काहीतरी चमकणे, (ब) जुन्या आठवणी वर येणे,
(क) पापणीही न हालवता पाहणे, (ड) मनाला मोती लगडल्यागत होणे.

४. **खालील परिच्छेदातील नामे शोधून लिहा.** (६.५.१)
कुंडी पसरत पसरत माझ्यासमोर शेत होऊन राहिली. मनात एक पाऊस आला. तापून सोक पडलेली ढेकळं पाणी पिऊन मऊ झाली. त्यांना हळूहळू खाजवत त्यांच्या पाठीवर कुळव फिरवू लागलो. कुळवावर उभं राहून बैल दबवण्यात आणि शेपटीत हात घालून त्यांना पळवण्यात खूप मजा आली. पालथी पडून रानंही खुदूखुदू हसू लागली. मुहूर्त बघून पेरणी सुरू झाली.

५. **खास शेतीकामाशी संबंधित असे या पाठातले शब्द शोधून त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा व त्यांचा अर्थ समजून घ्या.** (३.५.२, ५.५.२, ७.५.१, ९.५.१)

## उपक्रम

- **एकमेकांच्या संगतीत कुंडीत वाढलेली कणसं एकमेकांशी बोलत आहेत, अशी कल्पना करून छोटासा संवाद लिहा.** (४.५.३)

- **शेतीबद्दलची गाणी पाठ करून वर्गात सादर करा.** (८.५.१)
- **तुमच्या परिसरातील शेतकऱ्यास भेटून त्याच्याकडून शेतीविषयी माहिती मिळवा, शेताला भेट द्या. वर्गात एखाद्या विद्यार्थ्याला शेतकऱ्याची भूमिका देऊन त्याला प्रश्न विचारा व माहिती मिळवा.** (८.५.१)

**व्याकरण :** (६.५.१)

**(२) संख्याविशेषण :**

खालील शब्द पाहा.

चार मुले, पहिला आठवडा, तिप्पट आंबे, सर्व पुस्तके

चार, पहिला, तिप्पट, सर्व ही विशेषणे आहेत. ती त्यांच्या पुढे येणाऱ्या शब्दांविषयी कोणती विशेष माहिती सांगतात ते पाहू.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **चार** मुले | : | मुले किती ? | – | चार |
| **पहिला** आठवडा | : | आठवडा कितवा ? | – | पहिला |
| **तिप्पट** आंबे | : | आंबे किती ? | – | तिप्पट |
| **सर्व** पुस्तके | : | पुस्तके किती ? | – | सर्व |

चार, पहिला, तिप्पट, सर्व ही विशेषणे त्यांच्यापुढे येणारी नामे किती आहेत हे सांगतात. म्हणजेच ती नामांची संख्या दाखवतात.

**नामांची संख्या दाखवणाऱ्या विशेषणांना 'संख्यावाचक विशेषणे' म्हणतात.**

आणखी काही उदाहरणे –

चौदा वर्षे, पाचवा धडा, दसपट रुपये, काही विद्यार्थी.

**(३) सार्वनामिक विशेषणे :**

खालील शब्द पाहा.

हा कागद, तो मनुष्य, ती शाळा, असली फुले.

वरील शब्दगटांतील 'हा, तो, ती, असली' ही विशेषणे त्यांच्यापुढे येणारी नामे कोणत्या प्रकारची आहेत हे सांगतात. पण 'हा, तो, ती' ही

मूळची सर्वनामे आहेत. सर्वनाम हे नामाच्या ऐवजी येते. पण येथे 'हा, तो, ती' हे शब्द नामाबरोबर आले आहेत व ते त्यांच्यापुढे येणाऱ्या नामांबद्दल विशेष माहिती सांगतात. म्हणजे जी मूळची सर्वनामे, ती वरील ठिकाणी विशेषणांचे कार्य करतात.

**सर्वनामांपासून बनलेल्या अशा विशेषणांना 'सार्वनामिक विशेषणे' म्हणतात.**

आणखी काही उदाहरणे –

माझे घर, तुझी विजार, एवढी फळे, त्याची शाळा.

- **वाचा आणि लक्षात ठेवा.**

नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्य रूपांवर विभक्ती प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लावताना अनुस्वार दिलेला असतो.

उदा. नामे : मुलांना, घरांत, घरांपुढे

सर्वनामे : त्यांना, आम्हांला

हा अनुस्वार आदरार्थी बहुवचनाच्या वेळीही दिलेला असतो.

उदा. काकांचा रुमाल, टिळकांची पगडी, राष्ट्रपतींचे भाषण.



# ५. माझी मुक्ताई

**कवयित्री : बहिणाबाई चौधरी**

**पाठपरिचय** : मुक्ताई ही ज्ञानेश्वरांची धाकटी बहीण. हिचे वय फक्त दहा वर्षांचे; पण तिच्या ज्ञानामुळे ती महायोगी चांगदेवाची गुरू झाली. तिच्यापेक्षा मोठ्या असलेल्या ज्ञानेश्वरांचीही समजूत तिने काढली. अशी ही मुक्ताई बहिणाबाईंनी भावपूर्ण शब्दांत रेखाटली आहे.



माझी मुक्ताई मुक्ताई, दहा वर्साचं लेकरू ।
चांगदेव योगीयानं, तिले मानला रे गुरू ॥

अरे संन्याशाची पोरं, कोनी बोलती हिनई ।
टाकी देयेल पोरांचं, कधी तोंड पाहू नही ॥

अरे असं माझं तोंड, कसं दावू मी लोकाले ।
ताटी लाई ग्यानदेव, घरामधी रे दडले ॥

उबगले ग्यानदेव, घडे असंगाशी संग ।
कयवयली मुक्ताई, बोले ताटीचे अभंग ॥

गह्यरले ग्यानदेव, डोये गेले भरीसन ।
असा भाग्यवंत भाऊ, त्याची मुक्ताई बहीन ॥



३.५.२/४.५.३, ५.५.१, ५.५.२, ९.५.१

(९.५.१)

**वर्साचं** - वर्षाचं
**टाकी देयेल** - टाकून दिलेल्या
**कयवयली** - कळवळली
**गह्यरले** - गहिवरले
**हिनई** - हिणवीत
**उबगले** - कंटाळले
**भरीसन** - भरून
**असंगाशी संग** - वाईट माणसांशी संबंध
**चांगदेव** - योगी पुरुष. गर्वाने फुलून जाऊन ज्ञानेश्वरांना भेटण्यासाठी तो वाघावर बसून आला; पण मुक्ताईचे ज्ञान पाहून त्याने तिला गुरू मानले.

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) मुक्ताईला गुरू कोणी मानले ?
(ब) ज्ञानदेव कशाला उबगले होते ?
(क) मुक्ताई आणि ज्ञानदेव यांच्यात कोणते नाते होते ?

२. **खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) मुक्ताई आणि तिच्या भावंडांचे तोंड पाहणे लोक का टाळत होते ?
(ब) ज्ञानदेव ताटी लावून घरात का बसले ?
(क) मुक्ताईच्या अभंगांचा ज्ञानेश्वरांवर कोणता परिणाम झाला.

३. **खालील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)
तोंड न पाहणे, असंगाशी संग घडणे

४. **'ण' ऐवजी 'न', 'ळ' ऐवजी 'य', 'ष' ऐवजी 'स' वापरलेले कवितेतील शब्द शोधा आणि त्या शब्दांचे प्रचलित भाषेतील रूप लिहा.** (९.५.१)

## उपक्रम

- **संत ज्ञानेश्वरांचे चरित्र मिळवून वाचा.** (३.५.३)
- **आपल्या परिसरात एखादा अनाथ मुलगा/मुलगी असल्यास त्याची/तिची भेट घेऊन दहा ओळींत माहिती लिहा.** (८.५.१, ४.५.३)



# ६. अहिल्याबाईंचे न्यायदान

**लेखक : शिवराम वाशीकर**

**पाठपरिचय :** या पाठात अहिल्याबाई होळकर यांचा राज्यकारभार आणि त्यांची न्यायदान पद्धती यांवर प्रकाश टाकला आहे. मुलांच्या मनात भ्रष्ट व्यवहाराबद्दल राग व न्यायव्यवस्थेबद्दल विश्वास निर्माण करण्याचे कार्य या पाठातून होते. अहिल्याबाईंची राजनीती आणि त्यांचा करारीपणा यांचे दर्शन यातून सहज होते.

(मूळ विशेषनाम 'अहल्या' असे आहे. त्याचा अपभ्रंश होऊन 'अहिल्या' असे रूढ झाले आहे, त्यामुळे पाठात रूढ नाव 'अहिल्याबाई' असे छापले आहे.)



अहिल्याबाई न्यायमंदिरात बसल्या होत्या. बाईंचा न्याय ऐकण्यासाठी नेहमीप्रमाणे प्रजाजनांनी न्यायमंदिर अगदी फुलून गेले होते. दोन-तीन फिर्यादींचे न्याय झाले, तोच भालदाराने कमावीसदार आल्याची वर्दी दिली. अहिल्याबाईंनी आज्ञा देण्यासाठी फक्त नुसती मान हालवली. होळकर राज्यातील कुबेरासारख्या धनवान धनकुंवरबाईच्या दत्तकपुत्राबद्दल न्याय ऐकण्यासाठी आता सारेच आतुर झाले.

३.५.२/१.५.१, २.५.४, ३.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ९.५.१

क्षणभरातच सिरोजचे कमावीसदार न्यायमंदिरात प्रवेश करताना दिसले. त्यांची मुद्रा काहीशी गोंधळलेली दिसत होती. अहिल्याबाईंनी त्यांच्या मुद्रेकडे अशा काही नजरेने पाहिले, की आपल्या हातून काहीतरी अपराध घडला आहे अशी त्याला जाणीव व्हावी. ती झाली, की नाही हे कमावीसदारांच्या चालण्याच्या निर्भय ऐटीवरून समजले नाही; पण कमावीसदारासारखा अधिकारी इतक्या भयचकित मुद्रेने प्रवेश करतो आहे, हे पाहून मात्र सगळे लोक आश्चर्यचकित झाले. न्यायमंदिरात नेहमीच्या मर्यादेपर्यंत येताच कमावीसदारांनी अभिवादन केले, पण अहिल्याबाईंनी ते रिवाजाप्रमाणे घेतले नाही. यावेळी मात्र कमावीसदार किंचित चमकला, पण मनाची चलबिचल त्याने दाखवली नाही. कमावीसदाराकडे भेदक नजरेने रोखून पाहत अहिल्याबाई गंभीर स्वरात म्हणाल्या,

''आमच्या राज्याची इभ्रत तुमच्यासारख्या थोर अधिकाऱ्यावरच अवलंबून असते, कमावीसदार !''

''आपल्या सेवकाला त्याची पूर्ण जाणीव आहे,'' कमावीसदाराने तशाच गंभीर, कणखर सुरात उत्तर दिले.

''आमच्या सेवकांनी आमच्या आज्ञा मानाव्यात हे त्यांचे कर्तव्य आहे ना ?''

''अलबत ! मी ते माझे कर्तव्य मानतो. कर्तव्यात मी कधीही कसूर केली नाही. देवींना तसं कुणी सांगितलं असेल, तर ते साफ खोटे आहे.''

''तसंच ठरावं आणि माझ्या लोकांची इभ्रत वाढावी. कमावीसदार, काही दिवसांपूर्वी, सिरोजच्या धनकुंवरबाईंना दत्तक घेण्याची आमची संमतीआज्ञा तुमच्याकडे रवाना झाली होती, त्याचं काय झालं ?''

''ती आज्ञा अक्षरशः पाळली आहे. धनकुंवरबाईंना दत्तक घेण्यास त्याच दिवशी आम्ही आमचीही आज्ञा दिली आहे.''

''अस्सं ?'' अहिल्याबाईंनी काहीशा रागीट मुद्रेने कमावीसदारांकडे

पाहत पुढे म्हटले, "आज्ञा देताना तुम्ही त्यांच्याकडे तीन लक्ष होनांची मागणी केली हे खरे आहे ?"

आता मात्र कमावीसदार चमकले. या अगदी अनपेक्षित प्रश्नाने त्यांचा गोंधळ उडून गेला. बेचैन होऊन त्यांनी चहूकडे पाहिले. त्यांना शरमल्यासारखे वाटले. इतक्या लोकांदेखत तो प्रश्न म्हणजे त्यांच्या अब्रूचा प्रश्न होता. त्यांना क्षणभर उत्तर देता आले नाही, तेव्हा अहिल्याबाईंनी किंचित दरडावून पुन्हा विचारले,

"त्यांच्याकडे तुम्ही तीन लक्ष होनांची मागणी केली होती काय ? याचं उत्तर द्या !"

"होय !" आता मागे घेण्यात अर्थ नाही, धीटपणाच केला पाहिजे असे ठरवूनच की काय, त्याने एकदम कर्कश स्वरात 'होय' म्हटले.

"माझ्या आज्ञेत तीन लक्ष होन घ्यावेत असे होते ?"

"आज्ञेत तसा स्पष्ट उल्लेख असण्याचं कारणच नाही," कमावीसदार आता अधिक धीटपणे कणखर शब्दांत बोलू लागला, "कारण निपुत्रिकाला दत्तक घेण्याची परवानगी देताना नजराणा घेण्याचा सरकारचा हक्कच आहे. रूढ राजनीतीच आहे ती !"

"एवढी मोठी रक्कम नजराणा घ्यायची रूढ राजनीती आहे ?" अहिल्याबाईंनी खोचक स्वरात विचारले.

"कोणाकडून किती रक्कम घ्यावी हे ठरलेले नाही," कमावीसदार पहिल्याप्रमाणेच बेमुर्वतपणे म्हणाला, "ती ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे ठरवायची असते."

"ते कोण ठरवते ?"

"आम्हीच. सारासार विचाराने ते आम्हीच ठरवतो."

"आणि मागितलेली रक्कम दिली नाही तर त्याची सगळी संपत्ती सरकारजमा करावी, हेही सारासार विचार करून तुम्हीच ठरवता ?"

या वेळी कमावीसदार पुन्हा चमकला, तरीही त्याने धीटपणे उत्तर दिले, ''होय, तशी दहशत घातल्याशिवाय धनिकांच्या हातून पैसा सुटत नाही.''

आता मात्र अहिल्याबाईंना राग आवरेना; त्या मध्येच चढ्या सुरात म्हणाल्या, ''कमावीसदार, कुणासमोर कसली बेजबाबदार बडबड करता आहात ? माझ्या नावावर, माझ्याच प्रजेवर कायदेशीर दरवडे घालणारे तुमच्यासारखे राजनीतिनिपुण सेवक माझ्या राज्यात क्षणभरसुद्धा नकोत. अहिल्याबाईच्या राजनीतीला काळे फासणाऱ्या तुमच्यासारख्या बेमुर्वत घमेंडखोर अधिकाऱ्यांस फासावरच चढवायला पाहिजे; पण तुमच्या वाडवडिलांनी होळकर राज्याची केलेली सेवा लक्षात घेऊन तुम्हांला तुमच्या अधिकारावरून बडतर्फ करण्याची शिक्षा दिली आहे. चोवीस तासांच्या आत आमच्या राज्यातून बाहेर जा.''



आणि मग अहिल्याबाईंनी धनकुंवरबाईंची समजूत घातली. तिने दत्तक घ्यायचे ठरवलेल्या मुलाला स्वतःच्या मांडीवर घेऊन वस्त्रे आणि पालखी दिली. "धनधान्यसंपन्न, कुळाची कीर्ती वाढवणारा, शतायुषी हो," असा आशीर्वाद देऊन त्याची पाठवणी केली.

(९.५.१)

**फिर्याद** - गाऱ्हाणे, तक्रार

**भालदार** - राजाचा दंडधारी सेवक

**कमावीसदार** - राज्यातील कर वसुली करणारा अधिकारी

**कुबेर** - अतिशय श्रीमंत व्यक्ती

**वर्दी देणे** - बातमी देणे

**आतुर होणे** - उत्सुक होणे

**मुद्रा** - चेहरा

**रिवाज** - पद्धत, रीत

**चमकला** - चपापला

**इभ्रत** - इज्जत

**रवाना करणे** - पाठवणे

**अलबत** - खात्रीने, निश्चित .

**कसूर** - चूक

**होन** - जुन्या काळातील सोन्याचे एक नाणे

**अब्रू** - इज्जत

**रूढ** - परंपरेने चालत आलेले

**बेमुर्वतपणे** - बेपर्वाईने, उद्धटपणे

**सारासार विचार** - योग्य काय अयोग्य काय याचा पूर्ण विचार

**दहशत** - भीती, धाक, धास्ती

**घमेंडखोर** - गर्विष्ठ

**बडतर्फ करणे** - कामावरून काढून टाकणे

**नजराणा** - भेट



## स्वाध्याय



१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) न्यायमंदिरातील सगळे लोक आश्चर्यचकित का झाले ?

(ब) आज्ञा देताना कमावीसदारांनी धनकुंवरबाईंकडे कोणती मागणी केली होती ?

(क) नजराणा घेण्याचे कोणते कारण कमावीसदारांनी सांगितले ?

(ड) धनकुंवरबाईंनी दत्तक घेण्याचे ठरवलेल्या मुलाला अहिल्याबाईंनी कोणता आशीर्वाद दिला ?

२. **खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) अहिल्याबाईंचा न्याय ऐकण्यासाठी प्रजाजन आतुर का झाले होते ?

(ब) कमावीसदारांनी कोणता अपराध केला होता ?

(क) कमावीसदारांना बडतर्फ करताना त्यांची कानउघाडणी अहिल्याबाईंनी कशाप्रकारे केली ?

३. **पाठातील योग्य शब्द योजून खालील वाक्ये पूर्ण करा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) प्रजाजनांनी न्यायमंदिर अगदी .................. गेले होते.

(ब) कमावीसदार किंचित चमकला, पण मनाची .................. त्याने दाखवली नाही.

(क) कर्तव्यात मी कधीही .................. केली नाही.

(ड) कमावीसदाराने तशाच गंभीर .................. सुरात उत्तर दिले.

(इ) .................. विचाराने ते आम्हीच ठरवतो.

(फ) तुम्हांला तुमच्या अधिकारावरून .............. करण्याची शिक्षा दिली आहे.

४. **खालील वाक्ये कोण, कोणास व केव्हा म्हणाले ते सांगा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) ''आमच्या राज्याची इभ्रत तुमच्यासारख्या थोर अधिकाऱ्यावरच अवलंबून असते.''

(ब) ''कर्तव्यात मी कधीही कसूर केली नाही.''

(क) ''आज्ञा देताना तुम्ही त्यांच्याकडे तीन लक्ष होनांची मागणी केली ?''

(ड) ''चोवीस तासांच्या आत आमच्या राज्यातून बाहेर जा.''

५. **खालील वाक्प्रचारांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)

(अ) कसूर न करणे (ब) इभ्रत वाढवणे (क) बेचैन होणे

(ड) सारासार विचार करणे (इ) बडतर्फ करणे

### उपक्रम

- **या पाठाचे नाट्यीकरण करून वर्गात त्यातील संवाद ऐकवा.** (१.५.१, २.५.४)
- **रामशास्त्री प्रभुणे यांच्या न्यायदानाबद्दलच्या गोष्टी मिळवून वाचा.** (३.५.३)

- **अहिल्याबाई होळकर यांची माहिती मिळवून ती सुवाच्य अक्षरांत लिहा.** (४.५.१, ४.५.३)

**व्याकरण :** (६.५.१)

आतापर्यंत आपण विशेषणांचे मुख्य तीन प्रकार पाहिले.

(१) गुणविशेषणे, (२) संख्याविशेषणे व (३) सार्वनामिक विशेषणे.

- **विशेष्य**

विशेषण ज्या नामाबद्दल विशेष माहिती सांगते, त्यास **'विशेष्य'** असे म्हणतात. उदा. 'पांढरा हत्ती' यातील 'पांढरा' हे विशेषण व 'हत्ती' हे विशेष्य.

- **अभ्यास**

**(१) खालील उताऱ्यातील विशेषणे शोधा व त्यांचे प्रकार सांगा.**

माझे गाव गोदावरीच्या काठावर वसलेले आहे. दोन जागी वळणे घेऊन गोदावरी नदी माझ्या गावाच्या तीन बाजूंनी वाहते. नदीकाठी जाऊन बसण्यास मला विलक्षण आनंद वाटतो.

**(२) खालील विशेषणांचा वाक्यांत उपयोग करा.**

चंचल, मंद, दुसऱ्या, भयंकर, ताजा.

**(३) खालील नामांना योग्य अशी विशेषणे सुचवा.**

इमारत, कपाट, कपडे, निसर्ग, कागद.

**(४) खालील विशेषणांची विरुद्धार्थी विशेषणे सांगा.**

कुरूप, भव्य, कडू.

- **वाचा आणि लक्षात ठेवा.**

'पूर' हा ग्रामवाचक शब्द कोणत्याही ग्रामनामास लावताना खालीलप्रमाणेच लिहावा. उदा. नागपूर, सोलापूर, गोरखपूर, तारापूर.



# ७. स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव

**लेखिका : इंदिरा कुलकर्णी**

**पाठपरिचय :** १५ ऑगस्ट १९९७ रोजी भारतीय स्वातंत्र्याला पन्नास वर्षे पूर्ण झाली. यानिमित्त या दिवशी कुमारी विजयालक्ष्मी सासवे हिच्या शाळेमध्ये मोठा समारंभ साजरा झाला. त्यानंतर दोन दिवसांनी शाळेला भेट देण्यासाठी शाळेत प्रतिष्ठित पाहुणे आले. मुख्याध्यापकांनी शाळेतील विद्यार्थ्यांना एका सभागृहात बोलावून छोटासा समारंभ आयोजिला आणि कु. विजयालक्ष्मी हिला १५ ऑगस्ट ९७ रोजी शाळेत साजरा झालेल्या स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवी समारंभासंबंधी निवेदन करायला सांगितले. ते निवेदन सादर करण्याच्या निमित्ताने कु. विजयालक्ष्मीने केलेले भाषण खाली दिले आहे.

सन्माननीय पाहुणे, आदरणीय मुख्याध्यापक, गुरुजन आणि
माझ्या मित्र-मैत्रिणींनो,

दोनच दिवसांपूर्वी आपल्या शाळेत 'स्वातंत्र्यदिन' साजरा झाला. त्याचा वृत्तान्त मुख्याध्यापकांच्या आज्ञेनुसार मी आपणांसमोर सादर करत आहे.

यंदाचा 'स्वातंत्र्यदिन' आपण फारच थाटामाटात साजरा केला; कारण दीडशे वर्षांच्या पारतंत्र्याच्या शृंखला तोडून आपला देश स्वतंत्र झाला. या वर्षी म्हणजे १५ ऑगस्ट १९९७ रोजी भारतीय स्वातंत्र्याला पन्नास वर्षे पूर्ण झाली. त्यामुळे हा आनंदोत्सव आपल्या शाळेतील विद्यार्थ्यांनी अत्यंत उत्साहाने साजरा केला.

या समारंभाची पूर्वतयारी करण्यासाठी गेल्या आठवड्यात शाळा सुटल्यानंतर सर्व विद्यार्थी गुरुजींसह शाळेचे आवार व तिचा परिसर स्वच्छ

३.५.२/२.५.१, २.५.२, २.५.३, ४.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ९.५.१

करण्यात गुंतले होते. यात वरच्या वर्गातील मोठी मुले तर होतीच, पण खालच्या वर्गातील लहान मुलेसुद्धा साफसफाई करण्यात गर्क होती. मुख्याध्यापकांनी प्रत्येक वर्गाला स्वच्छता मोहिमेसाठी जागा नेमून दिली होती; त्यानुसार सर्व कामे अगदी शिस्तीत चालली होती. कोणतेही काम हलके नसते आणि श्रम करण्यात कसल्याही प्रकारचा कमीपणा मानण्याचे कारण नाही, अशी शिकवण यातून आम्हांला मिळत होती.

आमच्यापैकी प्रत्येकजण आपापला वर्ग स्वच्छ व सुंदर करण्यासाठी एकमेकांशी चढाओढ करत होता.

वर्गातील छायाचित्रे स्वच्छ करणे, सुविचारांचे तक्ते लिहिणे, भारतीय जनतेला शुभेच्छा फळ्यावर लिहिणे असे काम प्रत्येकजण मनापासून करत होता. रंगीबेरंगी तोरणे, पताका वर्गा-वर्गामध्ये लावल्या होत्या. फुलांच्या माळाही लावल्या होत्या. मुलांनी सडा घालून रांगोळ्यांनी सारे मैदान सुशोभित केले होते.

माननीय मुख्याध्यापकांच्या हस्ते ध्वजवंदन झाले. गणवेशातील मुलांनी बँडच्या तालावर ऐटीत संचलन केले आणि सर्वांकडून टाळ्या घेतल्या. नंतर दिवसभर निबंध स्पर्धा, भाषण स्पर्धा, स्वातंत्र्य-संग्रामाबाबतच्या कथाकथन स्पर्धा, वर्ग सजावट स्पर्धा आणि क्रीडा स्पर्धा असे भरगच्च कार्यक्रम झाले. याशिवाय विद्यार्थ्यांचे लेझिम, शारीरिक कवायती व वेगवेगळ्या कसरती पाहण्यासाठी आमचे पालक, गावातील नागरिक आणि मुले यांनी खूप गर्दी केली होती. सर्व वातावरणात एकच आनंद व उत्साह भरून राहिला होता.

या आनंदोत्सवाचा समारोप बक्षीस समारंभाने झाला, आमच्या वर्गाला सजावटीचे पहिले बक्षीस मिळाल्याचे मुख्याध्यापकांनी जाहीर करताच सर्वांनी टाळ्यांचा कडकडाट केला, तेव्हा मला आमच्या वर्गाचा खूप अभिमान वाटला.

समारोपाच्या वेळी आपल्या भाषणात मुख्याध्यापक म्हणाले,

"१५ ऑगस्ट १९४७ रोजी आपला देश स्वतंत्र झाला. आपण सारे स्वतंत्र भारतात जन्माला आलो. स्वातंत्र्याच्या मोकळ्या वातावरणात आपण श्वास घेत आहोत. पारतंत्र्याच्या काळोखाची, गुलामगिरीच्या वेदनांची आपल्याला कल्पनाही नाही, त्यामुळे कधीकधी हे स्वातंत्र्य किती अनमोल आहे, हे आपल्या लक्षात येत नाही; पण हे स्वातंत्र्य मिळवण्यासाठी जवळ जवळ १५० वर्षे आपला देश प्राणपणाने लढत होता. हजारो लोकांनी त्यासाठी हालअपेष्टा सोसल्या, तुरुंगवास भोगले. अनेक तरुणांनी यासाठी आपल्या आयुष्याचे बलिदान केले. त्यांनी स्वातंत्र्याचा ध्यास घेतला, स्वातंत्र्यासाठी सर्वस्वाचा त्याग केला. यात नंदुरबारच्या शिरीषकुमारसारख्या मुलाचाही मोलाचा वाटा आहे. शिरीषकुमारने इतक्या लहान वयात देशभक्तीपोटी आपले आयुष्य ओवाळून टाकण्याचे दिव्य केले; म्हणूनच हा भाग्याचा दिवस दिसू शकला."

स्वातंत्र्यासाठी बलिदान केलेल्या देशभक्तांबद्दल बोलताना मुख्याध्यापकांचा कंठ दाटून आला होता व आमचे डोळे भरून आले होते. शेवटी त्यांनी हा सोहळा सफल केल्याबद्दल आम्हा विद्यार्थ्यांना शाबासकी दिली; त्यामुळे आम्हांलाही गेला आठवडाभर केलेल्या कष्टांचे चीज झाल्यासारखे वाटले. आम्ही सर्वांनी आपल्या मातृभूमीवर प्रेम करण्याची व तिच्यासाठी स्वार्थत्याग करण्याची प्रतिज्ञा केली.

त्यानंतर सामूहिक राष्ट्रगीत होऊन हा स्फूर्तिदायक कार्यक्रम समाप्त झाला.

माननीय मुख्याध्यापकांनी मला पाहुण्यांसमोर वृत्तान्त सादर करण्याची संधी दिली, याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानते आणि माझे भाषण संपवते.

(९.५.१)

**वृत्तान्त** - घडलेल्या प्रसंगाची अथवा घटनेची क्रमवार संकलित केलेली माहिती

**स्वार्थ** - स्वतःचे हित

## स्वाध्याय

**१. खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) आपल्या देशाला कोणत्या साली स्वातंत्र्य मिळाले ?

(ब) ध्वजवंदन कोणाच्या हस्ते झाले ?

(क) विजयालक्ष्मीच्या शाळेला शासनाकडून कोणत्या कारणासाठी बक्षीस मिळाले ?

(ड) भारतीय स्वातंत्र्यलढ्यात शिरीषकुमारने काय केले ?

(इ) शाळेतल्या सर्व मुलांनी कोणती प्रतिज्ञा केली ?

**२. खालील प्रश्नांची तीन-चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) सुवर्णमहोत्सवाच्या समारंभाची पूर्वतयारी कशी केली ?

(ब) शाळेत स्वातंत्र्यदिनाच्या समारंभात कोणकोणत्या स्पर्धा घेण्यात आल्या ?

(क) मुलांनी वर्गाची सजावट कशाप्रकारे केली ?

**३. मुख्याध्यापकांच्या भाषणातील पाच मुद्दे पुढे दिले आहेत. त्यांविषयी एक-एक वाक्य लिहा.** (४.५.३, ५.५.२)

स्वातंत्र्य, गुलामगिरीच्या वेदना, स्वातंत्र्यलढा, देशभक्तांचे स्मरण, आपली जबाबदारी.

**४. खालील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)

कंठ दाटून येणे, डोळे भरून येणे, बलिदान करणे, कष्टाचे चीज होणे.

## उपक्रम

- **भारताला स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या राष्ट्रपुरुषांची चरित्रे मिळवून वाचा.** (३.५.३)
- **भारतीय स्वातंत्र्यलढ्यामध्ये सहभाग देऊन पराक्रम गाजवणाऱ्या भारतीय महिलांची माहिती मिळवून वर्गात सांगा.** (२.५.३)
- **भारतीय स्वातंत्र्यलढ्यात आत्मबलिदान देणाऱ्या बालवीरांची माहिती मिळवून वाचा. तीच माहिती वर्गात सांगा.** (३.५.३, २.५.१, २.५.३)

- **इंग्रजांनी भारतावर सुमारे दीडशे वर्षे राज्य केले, त्या काळात तुम्ही असता, तर काय केले असते ? भाषण करा.** (२.५.२)

**व्याकरण :** (६.५.१)

- **सर्वनामांचे प्रकार**

नामांऐवजी येणाऱ्या शब्दांना 'सर्वनामे' म्हणतात, हे आपण मागील इयत्तेत शिकलो. आता ही सर्वनामे किती प्रकारची आहेत हे पाहू.

**(१) पुरुषवाचक सर्वनामे**

वसंत जयंताशी बोलत होता. वसंत म्हणाला, ''मी आज येऊ शकत नाही. तू एकटाच रमेशकडे जा. जर तो येतो म्हणाला, तर आपण रविवारी सहलीला जाऊ. तुम्ही काय ठरवता ते मला कळवा.''

या उताऱ्यात 'मी, तू, तो, आपण, तुम्ही' ही सर्वनामे, बोलणाऱ्या व्यक्तींबद्दल वापरली आहेत. बोलणाऱ्यांच्या दृष्टीने आपण सर्व वस्तूंचे तीन वर्ग करतो. पहिला वर्ग बोलणाऱ्यांचा, दुसरा वर्ग ज्यांच्याशी आपण बोलतो त्यांचा व तिसरा वर्ग ज्याच्यासंबंधी आपण बोलतो त्या व्यक्ती व इतर वस्तू यांचा. या सर्वांना व्याकरणात 'पुरुष' हे नाव आहे व यांच्याबद्दल येणाऱ्या सर्वनामांना **पुरुषवाचक सर्वनामे** म्हणतात. बोलणारा हा प्रथमपुरुष. तो एकटा असेल, तर स्वतःबद्दल 'मी' म्हणेल. बोलणारे अनेक असतील, तर ते स्वतःबद्दल 'आम्ही' असे म्हणतील. जसे –

''मी उद्या येईन.'' ''आम्ही उद्या येऊ.''

'मी' व 'आम्ही' ही प्रथमपुरुषवाचक सर्वनामे आहेत.

ज्याच्याशी बोलायचे तो द्वितीयपुरुष. 'तू' व 'तुम्ही' ही द्वितीयपुरुषवाचक सर्वनामे.

ज्यांच्याबद्दल बोलायचे त्या व्यक्ती व इतर वस्तू यांना तृतीयपुरुष म्हणतात. 'तो, ती, ते, त्या, ती' ही तृतीयपुरुषवाचक सर्वनामे होत.

या सर्वनामांप्रमाणेच ज्या वस्तूंबद्दल व प्राण्यांबद्दल आपण बोलतो ते सर्व तृतीयपुरुषी असतात.



# ८. बाप

**कवी : इंद्रजीत भालेराव**

**पाठपरिचय :** मिरचीभाकर खाऊन रात्रंदिवस शेतात राबणाऱ्या शेतकरी बापाच्या कष्टमय दरिद्री जीवनाचा परिचय कवींनी करून दिला आहे. 'आयते मिळालेल्या अन्नाला स्वतः कष्ट करून मिळवलेल्या अन्नाच्या चवीची सर येणार नाही' हा आशय या कवितेतून व्यक्त होतो. श्रमप्रतिष्ठेचे मूल्य या कवितेतून रुजवता येईल.

शेतामधी माझी खोप, तिला बोराटीची झाप
तिथं राबतो, कष्टतो माझा शेतकरी बाप



लेतो अंगावर चिंध्या, खातो मिरची भाकर
काढी उसाची पाचट जगा मिळाया साखर
काटा त्याच्याच का पायी, त्यानं काय केलं पाप ?



माझा बाप शेतकरी, उभ्या जगाचा पोशिंदा
त्याच्या भाळी लिहिलेला रातदिस कामधंदा
कष्ट सारे त्याच्या हाती, दुसऱ्याच्या हाती माप





३.५.२/५.५.१, ५.५.२, ७.५.१, ९.५.१

बाप फोडतो लाकडं माय पेटविते चुल्हा
पिठामागल्या घामाची काय चव सांगू तुला
आम्ही कष्टाचंच खातो, जग करी हापाहाप !

(९.५.१)

**खोप** - झोपडी

**लेतो** - अंगावर घालतो

**पोशिंदा** - पालनपोषण करणारा

**पाई** - पायात

**पाप** - अपराध, गुन्हा

**पाचट** - ऊसाची वाळलेली पाने

**पिठामागल्या घामाची चव** - पीठ म्हणजे अन्न, घाम म्हणजे कष्ट. अन्न मिळवण्यासाठी करायच्या कष्टाची किंमत कळल्याने कष्ट करून मिळवलेल्या अन्नाची चव किंवा गोडी अधिक वाढते.

**झाप** - काटेरी झुडपांच्या फांद्यांपासून बनवलेले दार

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) कवीचे वडील शेतात कोणते पीक काढतात ?
(ब) 'कष्टाचे खाणे' म्हणजे काय ?

२. **खालील अर्थ असणाऱ्या कवितेतील ओळी सांगा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) यांच्या कष्टामुळेच अनेकजणांची पोटे भरली जातात.
(ब) स्वतः खूप कष्ट करून आपले पोट भरण्यात अतिशय आनंद असतो.

३. **खालील वाक्यांतील गाळलेल्या जागी कंसातील योग्य शब्द भरा.** (५.५.१)
(अ) आम्ही स्वतःच्या ............... खातो.
(मालकीचे/कष्टाचे/हद्दीतील)
(ब) शेतकरी हा उभ्या जगाचा ................ आहे.
(मालक/पोशिंदा/रक्षक)

४. **खालील प्रश्नांच्या उत्तरासाठी प्रत्येकी तीन-तीन पर्यायी उत्तरे दिलेली आहेत, त्यातील योग्य उत्तरापुढे ✓ अशी खूण करा.** (५.५.१)

**(१) झोपडीला बोराट्याची झाप का लावलेली असते ?**

(अ) झोपडीचे दार कोठे आहे, हे इतरांना कळू नये म्हणून.

(ब) कीटकांपासून बचाव व्हावा म्हणून.

(क) गरिबांना घरासाठी अशाच गोष्टी परवडतात म्हणून.

**(२) आपल्या वडिलांच्यावर हा एक प्रकारचा अन्याय आहे, असे कवीला का वाटते ?**

(अ) अज्ञानामुळे.

(ब) पितृप्रेमामुळे.

(क) वडिलांच्या कष्टाचा फायदा दुसरेच घेतात, हे लक्षात आल्यामुळे.

५. **योग्य जोड्या जुळवा.** (५.५.१, ९.५.१)

| 'अ' गट | 'ब' गट |
| --- | --- |
| (अ) कष्टाचे खाणे | (अ) आयत्या गोष्टीचा लोभ धरणे. |
| (ब) भाळी असणे | (ब) स्वतः कष्ट करून त्यावर आपली उपजीविका करणे. |
| (क) हापाहाप करणे | (क) नशिबात असणे. |

६. **'कष्ट सारे त्याच्या हाती दुसऱ्याच्या हाती माप' या ओळीत 'हात' शब्दाचे 'हाती' असे रूप आलेले आहे. खाली दिलेल्या शब्दांपासून अशा प्रकारचे शब्द तयार करा. त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१, ९.५.१)

मन, माथा, जन, जग.

□□□

# ९. निसर्गाचे वरदान !

**लेखक : दिलीप कुलकर्णी**

**पाठपरिचय :** अन्न, पाणी, हवा या निसर्गाने दिलेल्या गोष्टी आहेत. आपण सतत निसर्गापासून काहीना काही घेत असतो, त्या मोबदल्यात आपण देत काहीच नाही. यामुळेच निसर्गाचा, पर्यावरणाचा समतोल बिघडून सबंध जीवसृष्टीचा सर्वनाश ओढवण्याची शक्यता निर्माण झाली आहे. 'देतो तो निसर्ग, घेतो तो मानव' हे समीकरण बदलून निसर्गापासून मानवाने दातृत्वाचा धडा घ्यावा आणि पर्यावरणाचे रक्षण करावे, हेच या पाठातून शिकता येईल.



"माधवकाका ! आम्ही सगळे तयार आहोत आता. कुठे बसूया अभ्यासाला ?" आनंदने विचारले.

"पर्यावरणाचा अभ्यास चार भिंतींत बसून मुळीच करायचा नसतो !" माधवकाका म्हणाले, "चला, घराबाहेर पडू. कुठेतरी झाडाखाली बसू."

१.५.२/४.५.३, ५.५.१, ५.५.२, ९.५.१

पाखाडी उतरून नदीकडे जाताना एक पिंपळाचं झाड माधवरावांना दिसलं. ''चला, इथेच या पिंपळाच्या पारावर बसूया अभ्यासाला,'' ते म्हणाले.

सर्वजण गोल करून बसले.

''छान ! आता मला सांगा, 'पर्यावरण' या शब्दाचा अर्थ कुणाकुणाला माहिती आहे बरं ?'' माधवरावांनी विचारले.

''पर्यावरण म्हणजे निसर्ग,'' अजित म्हणाला, ''म्हणजे झाडं, पक्षी, प्राणी असं सगळं.''

''अन् हवा, पाणी, जमीन अशांसारख्या गोष्टीही !'' अंकिता म्हणाली.

माधवकाका म्हणाले, ''बरोबर ! आता या पर्यावरणात राहणारा प्रत्येक प्राणी निसर्गाकडून किंवा इतर प्राण्यांकडून काहीतरी घेतो; पण त्याचबरोबर तो काहीतरी परतही करतो. जशी घेवाण होते, तशी देवाणही होते. गुरं जमिनीवर चरतात, पण शेणाच्या रूपानं सेंद्रिय खत जमिनीला परत करून ती सुपीक करतात. मधमाश्या मध पितात, त्याच वेळी परागीभवन घडवून आणून निसर्गातलं एक फार मोठं काम करतात. झाडं जमिनीतलं पाणी आणि अन्नद्रव्यं शोषून घेतात, पण त्या बदल्यात प्राणवायूच्या रूपानं सर्वांना श्वास देतात, फळं देऊन प्राण्यांची भूक भागवतात. सापासारखा प्राणीसुद्धा उंदीर फस्त करून पिकांच्या संहाराला आळा घालण्याचं काम करतो. एवढंसं लिबलिबीत गांडूळ, पण तेसुद्धा जमीन भुसभुशीत बनवण्याचं काम करतं, जमीन सुपीक बनवतं.

माणूस मात्र निसर्गातून, इतर प्राण्यांकडून फक्त काहीतरी घेताना दिसतो. सगळ्यांकडून उपयोगी गोष्टी घ्यायच्या आणि द्यायच्या मात्र निरुपयोगी किंवा घातक गोष्टी ! असा माणसांचा खाक्या बनला आहे. जमिनीतून अन्न मिळवायचं, पण तिला द्यायचं काय, तर जळजळीत रासायनिक खत ! हवेतून प्राणवायू घ्यायचा आणि तिच्यात सोडायचे





काय, तर विषारी वायू आणि धूर ! निसर्गातल्या शुद्ध पाण्याचा उपयोग करायचा, पण त्या पाण्यात सोडायची घातक, विषारी अशी रसायनं ! जमिनीत खाणी खणायच्या आणि तिथला कच्चा माल संपल्यावर त्या तशाच सोडून द्यायच्या ! लाकडासाठी जंगलंच्या जंगलं साफ करायची ! अणुशक्ती केंद्रांमधील किरणोत्सर्गी राख बेफिकीरपणे जमिनीत गाडायची किंवा समुद्रात टाकायची ! या सगळ्यात निसर्गाला जे हवं त्यापैकी काय परत करतो माणूस ? आपण फक्त निसर्गाला लुबाडतो. मानव सोडता बाकी सर्व प्राणी निसर्गाचं पोषण करतात. माणूस तेवढा त्याचं शोषण करतो. पटतंय ना ?''

सर्वांनी होकारार्थी माना डोलावल्या.

"माणसाच्या या वागण्यामुळेच निसर्गाचा किंवा पर्यावरणाचा तोल पार ढासळून गेला आहे. असंख्य प्रकारचे जीवाणू, किडे, पक्षी, प्राणी, वनस्पती यांच्यातले जे परस्परसंबंध आहेत त्यांत 'परस्परपूरकता' आहे. एकमेकांना पूरक आणि एकत्रपणे विचार केला, तर पर्यावरणाला पोषक अशा प्रकारानं हे मानवेतर सजीव काम करतात. ते काहीतरी घेतात आणि त्याचबरोबर देतातही. त्यामुळे निसर्गातील जी विविध चक्रं आपण पाहतो, ती अखंडितपणे काम करतात. पर्यावरणातल्या साखळ्या अतूट राहतात. भूकंप, वणवे यांसारख्या नैसर्गिक उत्पातांमुळे पर्यावरणाची हानी झाली, तरी ती भरून निघते."

"माणसाच्या वागण्यात मात्र अशी परस्परपूरकता नाही. 'आपण निसर्गाचा एक घटक आहोत, निसर्गचक्रात आपण बाधा आणता कामा नये' हे माणूस आता जणू विसरला आहे. निसर्गाचे मालक असल्यासारखे आपण वागू लागलो आहोत. इतर सगळ्यांना आपण नोकरासारखे किंवा वेठबिगारांसारखे वागवू लागलो आहोत. आपल्याला गाई-म्हशी हव्यात, पण त्या 'दूध देणारी यंत्रं' या स्वरूपात ! आपल्याला घोडे हवेत ते करमणुकीसाठी ! आपल्याला शेळ्या, मेंढ्या, डुकरं हवीत, ती कापून खाण्यासाठी ! आपल्याला जंगलं हवीत, ती लाकडाच्या रूपातल्या कच्च्या मालासाठी ! आपल्याला पृथ्वी हवी, ती नैसर्गिक साधनसंपत्ती लुटण्यासाठी ! आपण फक्त घेणार, लुटणार, ओरबाडणार, मारून टाकणार, विध्वंस करणार ! काय होईल निसर्गाचं अशा वागण्यानं ?"

"आजचे विचारवंत खूप व्यथित झाले आहेत माणसाच्या या वागण्यामुळे. अवघ्या दोन-तीनशे वर्षांत माणसानं या पर्यावरणाचा जो काही विध्वंस केला आहे, तो भविष्याविषयी चिंता निर्माण करणारा आहे. निसर्गाची खंडित झालेली चक्रं आणि तुटलेल्या साखळ्या यांचे दुष्परिणाम गेल्या दहा-वीस वर्षांपासूनच तीव्रतेनं जाणवू लागले आहेत. आमच्या

पिढीचं आयुष्य संपत आलं आहे, पण तुम्ही उगवत्या पिढीतले आहात. तुमच्या पिढीचं भवितव्य पाहून आमच्या पिढीतल्या विचारी माणसांच्या मनास यातना होत आहेत !''

माधवकाकांचे बोलणे ऐकता ऐकता मुले विचारात गढून गेली.

(९.५.१)

**वेठबिगार** - कुठलाही मेहनताना अथवा मजुरी न देता करवून घेतलेले काम. पूर्वीच्या काळी जमीनदार गरीब लोकांकडून जुलूम-जबरदस्तीने अशी कामे करवून घेत असत.

**पाखाडी** - चिरेबंदी अरुंद वाट

**खाक्या** - प्रघात, पद्धत

**व्यथित** - दुःखी

**वणवा** - जंगलात अचानक लागलेली आग

## स्वाध्याय

**१. खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) माधवकाका आणि मुले अभ्यास करायला कोठे बसली ?

(ब) 'पर्यावरण म्हणजे काय' याचे मुलांनी कोणते उत्तर दिले ?

(क) गुरे पर्यावरणाला कशाप्रकारे उपयोगी पडतात ?

(ड) मधमाश्या निसर्गातील कोणते महत्त्वाचे काम करतात ?

(इ) निसर्गचक्राविषयीची कोणती गोष्ट माणूस विसरला आहे ?

**२. खालील प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) मधमाश्या, झाडे, साप, गांडूळ हे निसर्गाचे पोषण कशाप्रकारे करतात ?

(ब) मानव पर्यावरणाचा तोल बिघडवतो, असे का म्हटले आहे ?

(क) माणूस निसर्गाचा मालक असल्यासारखा वागतो, असे का म्हटले आहे ?

**३. पाठातील योग्य शब्द योजून खालील वाक्यांतील गाळलेल्या जागा भरा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) मधमाश्या मध पितात, त्याच वेळी .............. घडवून आणतात.

(ब) सर्व प्राणी निसर्गाचं पोषण करतात; माणूस तेवढा त्याचं .......... करतो.

(क) नैसर्गिक ............... पर्यावरणाची हानी झाली, तरी ती भरून निघते.

(ड) एवढंसं ............... गांडूळ, पण तेसुद्‌धा जमीन ............... बनवण्याचं काम करतं.

४. **वाक्यात उपयोग करा.** (९.५.१, ८.५.१)

व्यथित होणे, आळा घालणे, शोषण करणे.

## उपक्रम

- **तुम्हांला आवडतील आणि करता येतील, असे काही उपक्रम खाली दिले आहेत. त्यांपैकी कोणतेही दोन उपक्रम करा आणि त्यासंबंधातील अनुभव वहीत नोंदवा.** (४.५.३)

(अ) प्लास्टिकच्या पिशव्यांचा वापर कमी करणे. (ब) फुलझाडे लावणे.

(क) परसात किंवा गच्चीवर कोथिंबीर, पालेभाज्या लावणे.

(ड) कोथिंबिरीच्या काड्या, पालेभाज्यांचे निवडून उरलेले देठ गाईगुरांना देणे.

(इ) 'एक मूल, एक झाड'.



- **वाचा आणि लक्षात ठेवा.**

उच्चारात बरेच साम्य असलेले; पण भिन्न अर्थ असणारे शब्द लिहिताना चुकल्यास विपरीत अर्थ दर्शवतात. केवळ ऱ्हस्व-दीर्घ, काना-मात्रा-अनुस्वार यांच्या फरकामुळे अर्थ बदलतात.

| | |
|---|---|
| उदा. ग्रह (सूर्याभोवती फिरणारा गोल) | भाषक (बोलणारा) |
| गृह (घर) | भाषिक (भाषेसंबंधी) |
| उपहार (नजराणा, भेट) | लक्ष (लाख, अवधान) |
| उपाहार (फराळ) | लक्ष्य (नेम, साध्य) |
| संचित (साठवलेले) | दिन (दिवस) |
| सचिंत (चिंताग्रस्त) | दीन (गरीब) |
| पिक (कोकीळ) | सुत (मुलगा) |
| पीक (धान्य) | सूत (धागा) |



# १०. भाऊंची चिकाटी

**लेखक : बजरंग सरोदे**

**पाठपरिचय :** डॉ. पंजाबराव देशमुख हे महाराष्ट्रातील थोर विचारवंत. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील मनमिळाऊपणा, प्रेमळपणा, गरिबांना मदत करणे, परिश्रम करण्याची तयारी इत्यादी गुणवैशिष्ट्ये या पाठात विशद केली आहेत. माणसाला जीवनात स्वकर्तृत्वाने मोठे होता येते. त्यासाठी आधी परिश्रम, चिकाटी, जिद्द या गुणांची जोपासना करावी लागते, हे मुलांच्या मनावर ठसवण्यास हा पाठ उपयुक्त आहे.



डॉ. पंजाबराव देशमुख महाराष्ट्रातील थोर विचारवंत. पापळ या छोट्या गावातील सामान्य शेतकरी कुटुंबात त्यांचा जन्म झाला. सगळे त्यांना 'भाऊ' म्हणत. हायस्कूल-शिक्षणासाठी भाऊ अमरावतीला गेले. तेथील वसतिगृहात राहू लागले.

एखादी गोष्ट मनाने घेतली, की ती पार पाडल्याशिवाय भाऊंना चैन पडत नसे. एकदा असेच झाले. लोणीचे मालपे नावाचे एक डॉक्टर वसतिगृहात आले. त्यांना पांजरकर, दारोकर या विद्यार्थ्यांची भेट घ्यायची होती. ते मुलांशी प्रेमाने बोलले. त्यांची चौकशी केली. मुलांना सहज एक कोडे सांगितले व ते रात्री नाटक पहायला निघून गेले. विद्यार्थी त्या

१.५.२/३.५.३, ५.५.१, ५.५.२, १.५.१

कोड्यात गुंतून पडले, पण कोणालाच ते सुटले नाही. विद्यार्थी हताश झाले. अखेर झोपी गेले.

रात्री तीन वाजले होते. डॉ. मालपे परत आले, तर भाऊ कोडे सोडवण्यात मग्न होता. डॉ. मालपेंना आश्चर्य वाटले. ते भाऊजवळ आले. प्रेमाने म्हणाले, ''बाळ, ते सारे राहू दे. आता ताबडतोब झोप तू. नाहीतर मला फार दुःख होईल.''

भाऊने त्यांचा मान राखला. तो अंथरुणावर पडला, पण काही केल्या झोप येईना. त्याचे विचारचक्र कोड्याभोवती फिरत होते. पहाट झाली. कोंबडे आरवले, तसा भाऊ उठून सरळ मालपेंकडे गेला. भाऊला हसतमुख पाहून मालपे म्हणाले, ''बाळ, आता मात्र खात्रीने उत्तर घेऊन आलास तू.''

भाऊ त्यांना म्हणाला, ''कसं काय कळलं हे आपल्याला ?''

ते म्हणाले, ''त्यात काय कठीण आहे ? तुझ्या प्रसन्न चेहऱ्यावरच वाचलं मी हे सारं ! अन् खरं म्हणजे रात्रीच मला तुजकडून हवं ते उत्तर मिळालं. इतक्या जिद्दीने नि निग्रहाने एखाद्या प्रश्नामागं लागावं हेही माझ्या प्रश्नाचं एक महत्त्वाचं उत्तर होतं. तुझ्या बुद्धिमत्तेबद्दल मला निश्चित असं वाटतं की, जीवनात कोणताही अवघड प्रश्न तू हाती घेतलास तर त्यात खात्रीने यशस्वी होशील.''

जीवनात मोठे होण्यासाठी बालपणापासूनच चिकाटी, परिश्रम व जिद्द या सद्गुणांची सवय लावणे आवश्यक असते, हे या उदाहरणातून पटते.

भाऊंच्या लहानपणीची आणखी एक गोष्ट. ते शाळेत असताना सर्वांशी प्रेमाने वागत. शेखसिंग आणि लोभ्या कुडवे हे भाऊंचे खास मित्र. लोभ्या घरचा अगदीच गरीब. स्वभावाने विनम्र. वृत्तीने प्रेमळ आणि मनमिळाऊ. तो भाऊबरोबर शाळेत जाई. अंगात कधी कधी सदरा नसे.

एक दिवस भाऊ आणि लोभ्या दोघे शाळेतून घरी येत होते. ऊन तापत होते. लोभ्याच्या अंगात सदरा नव्हता. अंगाला चटके बसत होते. भाऊच्या संगतीत त्याला याचे भान नव्हते. तो बालमित्र गप्पा करत चालला होता. भाऊच्या दृष्टीतून ही गोष्ट सुटली नाही. मनात कसेसेच झाले. त्याचे मन कळवळले. त्याने लोभ्याला थांबवले. अंगातला सदरा काढला आणि म्हणाला, "लोभ्या थांब, माझा सदरा घाल."

पण लोभ्या म्हणाला, "छे छे ! तुमचा सदरा ? मी कसा घालणार ?"

"नाही लोभ्या, तुझे उघडे अंग या उन्हात तापते आहे. ते मला पाहवत नाही." भाऊंनी सदरा देत म्हटले. त्याने लोभ्याच्या अंगात सदरा घातला. लोभ्याचे डोळे पाण्याने भरून आले. चेहऱ्यावर कृतज्ञता चमकली. भाऊने त्याच्या गळ्यात प्रेमाने हात घातला. दोघांनी घराचा रस्ता धरला.

लोभ्याच्या शरीराला बसणारे चटके जणू भाऊच्या मनाला वेदना देत होते.

आईला ही हकीगत समजली. आई गोड शब्दांत बोलली, "बरे केलेस ! लोभ्याला सदरा द्यायचा माझा विचार होताच. तो न सांगताच तू पुरा केलास. शाब्बास भाऊ, गरिबांना अशीच मदत करावी. यातच जन्माचे भलेपण आहे."

भाऊच्या अशा सत्प्रवृत्तींना आई-वडिलांचा पाठिंबा असायचा. यामुळेच भाऊंच्या अंगी अशा प्रवृत्ती वाढीस लागल्या. भाऊच्या जीवनाला योग्य आकार मिळाला.

हेच भाऊ पुढे आपल्या परिश्रमाने आणि कर्तृत्वाने विदर्भातील शिक्षणमहर्षी म्हणून नावारूपास आले.

(९.५.१)

**गुंतून पडणे** - अडकणे, गुरफटणे
**हताश होणे** - निराश होणे
**निग्रह** - दृढ निश्चय
**कृतज्ञता** - उपकाराची जाणीव
**नावारूपास येणे** - प्रसिद्धीस येणे

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) वसतिगृहातील सर्व विद्यार्थी झोपले तरी भाऊला झोप का येत नव्हती ?

(ब) भाऊंना कोड्याचे उत्तर सापडले, हे डॉ. मालपेंनी कसे ओळखले ?

(क) जीवनात मोठे होण्यासाठी बालपणापासूनच कोणकोणत्या सद्गुणांची सवय लावून घ्यावी ?

(ड) भाऊंनी आपल्या अंगातील सदरा लोभ्याला का दिला ?

(इ) आईने भाऊस शाबासकी का दिली ?

(फ) भाऊच्या अंगी असलेले चांगले गुण वाढीस लावण्यास आईवडिलांनी काय केले ?

२. **खालील प्रश्नांची उत्तरे पाच ते सहा वाक्यांत लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) डॉ. मालपेंनी भाऊला 'तू जीवनात खात्रीने यशस्वी होशील' असे का म्हटले ?

(ब) 'एखादी गोष्ट मनाने घेतली, की ती पार पाडल्याशिवाय भाऊला चैन पडत नसे.' याचे कोणते उदाहरण या पाठात आले आहे ?

३. **खालील प्रत्येक वाक्याला तीन पर्याय दिलेले आहेत, त्यांपैकी योग्य पर्यायासमोर ✓ अशी खूण करा.** (५.५.१)

**(१) भाऊला कोड्याचे उत्तर मिळाले, कारण -**

(अ) भाऊ रात्रभर जागत राहिले.

(ब) भाऊचे विचारचक्र कोड्याभोवती फिरत होते.

(क) भाऊला कोडे सोडवण्याची आवड होती.

(२) **भाऊने लोभ्याला स्वतःचा सदरा दिला, कारण –**

(अ) लोभ्या घरचा गरीब होता.

(ब) लोभ्याचे उघडे अंग उन्हात तापत होते, हे भाऊला पाहवत नव्हते.

(क) लोभ्या भाऊच्या बरोबर नेहमी राहत असे.

(३) **भाऊ मोठेपणी नावारूपास आले, कारण –**

(अ) त्यांनी वसतिगृहात राहून शिक्षण घेतले.

(ब) त्यांनी खूप कोडी सोडवली.

(क) ते कोणतेही चांगले काम जिद्दीने आणि निग्रहाने पूर्ण करत.

४. **वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)

गुंतून पडणे, निग्रह करणे, मनाने घेणे, मन कळवळणे.

## उपक्रम

- **डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या अंगी असलेल्या गुणांची यादी करा. त्यांपैकी एखादा तरी गुण आपल्या अंगी बाणवण्याचा आजच निश्चय करा.** (५.५.२)
- **डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या जीवनावरील पुस्तक शिक्षकांकडून मिळवा व वाचा.** (३.५.३)

**व्याकरण :** (६.५.१)

**(२) दर्शक सर्वनामे**

पुढील वाक्ये पाहा. हे माझे पुस्तक आहे. **ते** रमेशचे आहे.

एखादी वस्तू जवळ असेल, तर आपण लिंगभेदाप्रमाणे 'हा, ही, हे, ही' सर्वनामे वापरतो; पण तीच दूर असेल, तर 'तो, ती, ते, त्या' ही सर्वनामे वापरतो. ही सर्वनामे वापरताना आपण ते पदार्थ दर्शवतो किंवा दाखवतो; म्हणून त्यांना **दर्शक सर्वनामे** असे म्हणतात. 'हा, ही, हें, ह्या, तो, ती, ते, त्या' ही दर्शक सर्वनामे आहेत.

(३) **संबंधी सर्वनामे**

खालील वाक्ये पाहा.

(१) जो अभ्यास करत नाही, तो परीक्षेत नापास होतो.

(२) जे चकाकते, ते सारे सोने नसते.

(३) जी सत्याने वागते, ती मानास पात्र ठरते.

वरील वाक्यांत 'जो, जी, जे' या सर्वनामांचा संबंध त्याच वाक्यात पुढे येणाऱ्या 'तो, ती, ते' या दर्शक सर्वनामांशी असतो. म्हणून 'जो, जी, जे, ज्या' या सर्वनामांना **संबंधी सर्वनामे** म्हणतात.

(४) **प्रश्नार्थक सर्वनामे**

'रामा दूध पितो' हे साधे विधान आहे. यासंबंधी प्रश्न विचारायचा असल्यास 'रामा' या नामाबद्दल 'कोण' हे सर्वनाम ठेवावे लागते. तसेच 'दूध' या नामाबद्दल 'काय' हे सर्वनाम येते. जसे –

(१) कोण दूध पितो ? (२) रामा काय पितो ?

'कोण' व 'काय' यांमुळे वाक्यात प्रश्न विचारता येतो. म्हणून त्यांना **प्रश्नार्थक सर्वनामे** म्हणतात.

वाक्यात प्रश्न विचारला आहे, हे दाखवण्यासाठी त्या वाक्याला शेवटी प्रश्नचिन्ह ठेवावयास हवे.

कोण, काय, कोणास, कोणाचा, कोणी ही प्रश्नार्थक सर्वनामे होत.

- **वाचा आणि लक्षात ठेवा.**

**'ष्ट'** आणि **'ष्ठ'** अंती येणाऱ्या शब्दांची लिहिताना नेहमी गल्लत होते.

**शेवटी 'ष्ट' येणारे शब्द –**

उत्कृष्ट, प्रविष्ट, संतुष्ट, विशिष्ट, पुष्ट, परिशिष्ट, चौसष्ट, आकृष्ट, क्लिष्ट, चविष्ट, नादिष्ट, निर्दिष्ट, उद्दिष्ट.

**शेवटी 'ष्ठ' येणारे शब्द –**

स्वादिष्ठ, गर्विष्ठ, ज्येष्ठ, श्रेष्ठ, वरिष्ठ, बलिष्ठ, कनिष्ठ, प्रतिष्ठा, निष्ठा.



# ११. लपंडाव

**कवी : रवींद्रनाथ टागोर**

**पाठपरिचय :** हे एक गद्यकाव्य आहे. वेगवेगळी रूपे धारण करून आपण आईच्या जवळपास राहू, पण हा आपलाच 'मुलगा आहे' असे आईला ओळखता येणार नाही, याचे काव्यमय वर्णन यात आहे. मुलांच्या कल्पकतेला चालना मिळेल अशी ही रचना आहे.

आई ग, मी जर खोडकरपणाने चाफ्याच्या झाडावर
चाफ्याचे फूल होऊन फुललो
आणि पहाटेच्या वेळी झाडाच्या फांदीवर
कोवळ्या पानांवर लोळण घेतली; तर तू माझ्यापुढे हरशील
अन् तेव्हा काय, आई, तू मला ओळखशील ?
तू हाक मारशील, 'बाळ, कुठे रे आहेस ?'
मी गुपचूप बसून नुसता हसेन.

जेव्हा तू काही काम करायला बसशील तेव्हा
ते सगळे मी डोळे उघडून पाहीन;
स्नान करून, पाठीवर केस मोकळे सोडून
तू चाफ्याच्या झाडाखालून येशील
तेथून देवघराकडे जाशील,
दुरून तुला फुलांचा वास येईल
तेव्हा तुला समजणारसुद्धा नाही, की
हा आपल्याच मुलाच्या अंगाचा सुवास आहे.

३.५.२/३.५.३, ४.५.३, ५.५.१, ५.५.२, ७.५.१, ९.५.१

सर्वांची जेवणे झाल्यावर दुपारच्या वेळी,
हातात महाभारत घेऊन तू बसशील.
झाडाची सावली घराच्या खिडकीतून येऊन
तुझ्या पाठीवर-मांडीवर पडेल.
मी माझी छोटीशी सावली
तुझ्या पुस्तकावर पाडून हालवीन;
तेव्हा तुला समजणारसुद्‌धा नाही, की
आपल्या डोळ्यांत बाळाची सावली तरंगते आहे.



संध्याकाळच्या वेळी दिवा लावून
जेव्हा तू गोठ्यात जाशील,
तेव्हा मी फुलांचा खेळ खेळून टपकन्,
आई, जमिनीवर गळून पडेन.
पुन्हा मी तुझा बाळ होईन.
तुझ्याकडे येऊन म्हणेन, 'गोष्ट सांग.'
तू म्हणशील, 'लबाडा, होतास कुठे ?'
मी म्हणेन, 'ती गोष्ट नाही सांगणार.'

 **स्वाध्याय** 

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
   (अ) आईने बाळाला हाक मारली, तरी बाळ गुपचूप का बसणार होता ?
   (ब) चाफ्याच्या झाडाखालून जाताना आईला कोणती गोष्ट समजणार नाही, असे मुलाला वाटते ?
   (क) बाळाची सावली पुस्तकाच्या पानावर एवढीशी होऊन केव्हा पडेल ?
   (ड) फूल झालेला बाळ मूळच्या स्वरूपात केव्हा येणार आहे ?
   (इ) आपण कोठे होतो, हे बाळ आईला का सांगणार नाही ?

२. कोण कोणाशी लपंडाव खेळणार आहे आणि कसा, ते थोडक्यात सांगा. (५.५.१, ५.५.२)

३. खालील वाक्यांतील मोकळ्या जागी योग्य शब्द भरा. (५.५.१, ५.५.२)

(अ) झाडाची सावली .............. येईल.

(ब) बाळाची .............. पुस्तकावर पडेल.

४. योग्य जोड्या लावा. (५.५.१, ६.५.१)

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| कोवळे | बाळ |
| मोकळे | सावली |
| छोटीशी | केस |
| खोडकर | पान |

६. समानार्थी शब्द सांगून खालील शब्दांचा वर्णमालेनुसार क्रम लावा. (७.५.१, ९.५.१)
आई, फूल, डोळा, झाड.

७. विरुद्ध अर्थाचे शब्द सांगून खालील शब्दांचा वर्णमालेनुसार क्रम लावा. (७.५.१, ९.५.१)
फुलणे, हारणे, कोवळा, मोकळे, सुगंध.

## उपक्रम

- कल्पनाविश्वात रमायला कवितेतील मुलाला आवडते, तसे तुम्हांलाही आवडत असेल. मग तुम्हांला कोण व्हावेसे वाटते ? ते थोडक्यात लिहा. (१५ ओळी) (४.५.३, ५.५.२)
- चौथीच्या बालभारती पुस्तकातील 'झुळुक मी व्हावे' ही कविता पुन्हा एकदा वाचा आणि या दोन कवितांमधील साम्य शोधा. (३.५.३, ५.५.१)

व्याकरण :

(५) **सामान्य सर्वनामे**

पुढील वाक्ये पाहा.

(१) कोणी कोणास हसू नये.

(२) तुझ्या पिशवीत काय आहे ते पाहू.

या वाक्यांत 'कोणी', 'कोणास', 'काय' हे शब्द वापरले आहेत; पण वाक्यात प्रश्न विचारलेला नाही. या वाक्यातील 'कोणी', 'कोणास', 'काय' ही सर्वनामे कोणत्या नामांबद्दल आली आहेत हे निश्चित सांगता येत नाही. म्हणून अशा 'कोण व काय' या सर्वनामांना अनिश्चित किंवा **सामान्य सर्वनामे** म्हणतात.

## ■ अभ्यास

**(१) पुढील वाक्यांतील सर्वनामे ओळखा व त्यांचे प्रकार सांगा.**

(अ) जलवंती म्हणाली, ''छे ! मी एकटी नाही. तू माझी मैत्रीण आहेस. तुम्ही माझ्याविषयी जी आपुलकी दाखवता, ती मला विसरणे शक्य नाही.''

(आ) तिला एक झोपडी दिसली. अगदी लहान होती ती. झोपडीचे दार उघडून ती हळूच आत गेली. कोण होते तिथे ?

**(२) पुढील सर्वनामे वाक्यांत वापरून लिहा.**

जे, त्या, ही, आम्ही, काय, जी, ते.

● **वाचा आणि लक्षात ठेवा.**

मराठीत शब्दाच्या शेवटी येणारा 'इ'कार, 'उ'कार दीर्घ लिहिलेला असतो. उदा. आई, वाटी, टोपी, वही, पेटी, पिशवी, आगगाडी, कडू, खेळू, पळू, वाळू, करडू, दगडू.





# १२. नंदीवाला



**लेखक : व्यंकटेश माडगूळकर**

**पाठपरिचय :** नंदीबैलाबरोबर 'गुब्बू-गुब्बू' आवाज करत गावोगाव भटकून आपले पोट भरणाऱ्या नंदीवाल्यांच्या जीवनचर्येचे दर्शन या पाठातून घडवले आहे. चिठ्ठीचपाटी नसतानाही माणसामाणसातले होणारे 'चोख व्यवहार' हे त्या काळातील लोकांची माणुसकीवर असलेली श्रद्धा आणि विश्वास याचे दर्शन घडवतात. आजच्या काळातील ढासळत चाललेली जीवनमूल्ये अशिक्षित, भटक्या व विमुक्त अशा वर्गाच्या या परिचयामुळे पुन्हा रुजवण्यास आणि संस्कारित करून जोपासण्यास उपयुक्त ठरेल असा हा पाठ आहे.

आम्ही सोलापूर मार्गाने अकलूजला जायला निघालो होतो. गाडी बऱ्या वेगाने चालली होती.

सोलापूर मार्गाने जाताना, रस्त्याच्या दोन्ही बाजूंना उत्तम सृष्टिसौंदर्य दिसेल अशी आशाच नसते प्रवाशांची. तरी पण सकाळची सुरेख वेळ होती आणि बरड माळरानेसुद्धा सौम्य दिसत होती. मध्येच कुठे एकाकी उभे असलेले बाभळीवरील कोतवाल पक्षी, तर कुठे पंचरंगी पाखरे निवांत बसलेली दिसत होती.

मध्येच आमच्यासोबत असलेले गृहस्थ म्हणाले, ''ही बघा, नंदीवाल्यांची पाले.''

मी डाव्या खिडकीतून पाहत होतो. उजवीकडे पाहिले तर खरेच, माळावर पाखरांचा थवा उतरावा तशी पाले उतरली होती. काही नाही तरी शेसव्वाशे पाले असतील. मुले-माणसे हिंडत होती. कोणी हुशार चित्रकाराने निसर्गचित्र रंगवल्यासारखी ही नंदीवाल्यांची वस्ती आकर्षक दिसत होती.

३.५.२/२.५.२, २.५.३, ४.५.१, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ९.५.१



सुगीच्या दिवसांत आमच्या गावी येणारा, काळा कोट आणि जरीकाठी रुमाल बांधलेला नंदीवाला मला आठवला. जानेवारी महिना सरता झाला आणि शाळूची पिके निघू लागली, की एखाद्या सकाळी 'गुब्बू' 'गुब्बू' 'गुब्बू' असा आवाज कानावर येई. गावठी सनई वाजे. दाराबाहेर येऊन पाहावे, तर दोन-तीन नंदीवाले दिसत. एखादा मिशावाला असे, बाकी दोघे पोरसवदा असत आणि त्यांच्याबरोबर रंगीबेरंगी झुली

घालून सजवलेला तो प्रचंड मोठा गुण्या बैल असे. तेव्हा गीर, हरियाना वगैरे बैलांच्या जातीसंबंधी माहिती नव्हती. पाहिलेले असत ते सगळे टोकदार शिंगांचे, कोसल्या रंगाचे खिलारी बैल. त्यामुळे हा हत्तीसारखा प्रचंड ढवळा बैल, त्याची गोल शिंगे, काळेभोर नाक पाहिले, की औते ओढणारा हा साधासुधा बैल नाही, खरेच नंदी आहे, असे वाटे. शिंगांना पितळी शेंब्या घालून, चित्रविचित्र रंगाच्या कपड्याने ती सर्व आळपलेली, शिवाय रंगीत रुमाल बांधलेले, कपाळावर गोंडे, जांभळाएवढ्या मोठ्या दृष्टमण्यांच्या माळा. गळ्यात साखळी, माळा, गंडे, घंटा. पाठीवर सुंदर रेशमी झूल. तिच्यावर काळ्या-पांढऱ्या दोऱ्याने चित्रे भरलेली. पुढच्या दोन्ही पायांत रुप्याचे तोडे, असे या नंदीचे रूप मोठे छान सजवलेले असे.

पिपाणी वाजू लागे, डफडे वाजू लागे. हळदी-कुंकवाने माखलेले पुढचे दोन्ही खूर घेऊन नंदीबैल दारात आला, की कोणी सवाष्ण घरातून येई आणि त्याच्या पायावर पाणी ओतून हळदकुंकू वाही. काळ्या वर्णाचा आणि कानांत सोन्याची भिकबाळी घातलेला नंदीवाला हेल काढून म्हणे, ''अरं, माझ्या गुण्या बैला, पाटीलसाहेबास्नी हे साल बरं गेलं, म्होरचं चांगलं जाईल का ?''

यावर गुण्या बैल, 'होय, होय' अशी मान हालवी. त्या वेळी त्याच्या गळ्याची पोळी हाले, मोठे वशिंड हाले, शिंगांना आणि गळ्यात बांधलेल्या घंटा वाजत. ती भली मोठी शिंगे, ते मोठे थोरले तोंड हालले, की मोठ्ठा आणि खराखुरा आशीर्वाद मिळाला असे वाटे. गुण्या बैलानं होकार भरला, की नंदीवाला 'गुब्बू-गुब्बू-गुब्बू' असा शब्द आपल्या तालवाद्यावर करी.

लोकांचा वेढा लगेच भोवती पडे. पोरेटोरे आणि मोठी माणसेसुद्धा नंदीकडे कौतुकाने बघत उभी राहत.

''अरं, माज्या संभूसंकराच्या बैला, औंदा गावावर काही आपत हाये का ? पिलेग, महामारी, तापसर असा काही घाला यील का ?''

मान हालवून नंदी 'नाही, नाही' म्हणे आणि मोठ्याने ओरडून नंदीवाला सांगे, "नाही म्हणतो. नाही, नाही म्हणतो !" गुब्बू-गुब्बू-गुब्बू...

पाटलाला आणि सगळ्या गावकऱ्यांना बरे वाटे. हे काही वेळ चाले. पदरात शेर मापटे जोंधळे पडले, की नंदीवाला पुढच्या वाड्याकडे जाई.

नंदीबैल घेऊन गावोगावी फिरणे एवढा एकच उद्योग नंदीवाले करत नसत. गावातील कोणा शेतमजुराला वाढीदिढीने धान्य द्यावे आणि ते पुढच्या वर्षी वसूल करावे, एखादा देखणा खोंड या गावी खरेदी करावा, सांभाळावा आणि वर्षभराने जास्त किमतीला विकावा, असेही त्यांचे चाले. पुढच्या वर्षी मणाचे सव्वा मण घालीन या बोलीने नंदीवाल्याकडून घेतलेले धान्य कुणी परत नाही केले अशी ओरड कधी मी ऐकलेली नाही. चिठ्ठीचपाटी नसताना हा व्यवहार चोख पाळला जाई.

सुगी सुरू झाली, की परदेशी पाखरे जशी आमंत्रण न करता येत आणि आपला शेर घेऊन जात, तसे नंदीवालेही येत आणि आपला शेर वसूल करून जात.

त्यांची उतरण्याची जागा ठरलेली असे आणि प्रत्येक वेळी तेच कुटुंब येई. ओढ्यापलीकडे गावाला लागूनच रान होते. या रानात दरवर्षी त्यांची पाले पडत. या रानाच्या आसपास कुणाचे हिरवे शेतमळे, बागा नव्हत्या.

या भटक्या लोकांविषयी लहानपणापासून फार मोठे कुतूहल माझ्या मनात आहे. कधीकाळी एकदा सगळ्या व्यापातून सुटी घ्यावी आणि एका नंदीवाल्याबरोबर 'गुब्बू-गुब्बू' आवाज करत गावोगाव हिंडावे, पालात राहावे, उघड्यावर बसून भाकरी खावी, कुत्री घेऊन ससे-घोरपडीची शिकार करावी आणि आपल्या या मराठी मुलखात मैलोगणती पायी हिंडावे, असे मला फार वाटते.

(९.५.१)

**बरड माळरान** - उपजाऊ नसलेली पडीक जमीन **पिलेग** - प्लेग

**शाळू** - ज्वारीचा एक प्रकार **आळपणे** - गुंडाळणे

**शेर मापटे** - पूर्वीच्या काळातील धान्य मोजण्याचे माप, साधन

**शेंबी** - बैलाच्या शिंगाच्या टोकांना लावलेले पितळी टोपण

**मण** - जुन्या काळातील धान्य मोजण्याचे परिमाण **चार शेर** - एक पायली

**सोळा पायल्या** - एक मण **गंडा** - काळा दोरा

**शेर घेऊन जाणे** - वाटा घेऊन जाणे **मुलूख** - प्रदेश, भाग

**आपत** - आपत्ती, संकट

**भिकबाळी** - पुरुषाने कानात घालायचा दागिना

**वशिंड** - बैलाच्या मानेजवळचा उंचवटा **महामारी** - कॉलरा

**घाला** - आपत्ती, संकट **मैल** - अंतर मोजण्याचे परिमाण

**खोंड** - गोऱ्हा, पाडा, तरुण बैल

**पाल** - ताडपत्री, गोणी यांसारख्या कपड्यांपासून तात्पुरता राहण्यासाठी केलेला निवारा

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) नंदीवाल्यांची वस्ती कशासारखी दिसत होती ?

(ब) नंदीबैलाने आशीर्वाद दिला असे केव्हा वाटे ?

(क) नंदीवाले गावात केव्हा येत ?

२. **खालील प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) नंदीबैलाचे वर्णन लेखकाने कसे केले आहे ?

(ब) नंदीवाले कोणकोणते उद्योग करत असतात ?

(क) व्यापातून सुटी घेऊन काय करावे असे लेखकाला वाटते ?

३. **या पाठाच्या आधारे नंदीवाल्याचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.** (४.५.३)

४. **पाठामध्ये काही सुंदर वाक्ये आली आहेत, ती लिहून एकत्र करा.** (३.५.२, ४.५.१, ५.५.१)

उदा. – माळावर पाखरांचा थवा उतरावा, तशी पाले उतरली होती.

५. **खालील वाक्ये कोण, कोणास व केव्हा म्हणाले ते सांगा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) ''ही बघा नंदीवाल्यांची पाले.''

(ब) ''अरं, माझ्या गुण्या बैला, पाटीलसाहेबास्नी हे साल बरं गेलं, म्होरचं चांगलं जाईल का ?''

(क) ''नाही म्हणतो. नाही, नाही म्हणतो...''

६. **खालील वाक्यांतील अधोरेखित शब्दांचे अर्थ सांगा.** (९.५.१)

(अ) पदरात <u>शेर</u> मापटे जोंधळे पडले.

(ब) नंदीवाले आपला <u>शेर</u> वसूल करून जात.

## उपक्रम

- **डोंबारी, वासुदेव, कडकलक्ष्मी, गारुडी असे वेगवेगळे लोक अनेक खेळ करून दाखवतात. तुम्ही पाहिलेल्या अशा लोकांविषयी माहिती सांगा.** (२.५.३)
- **या पाठाच्या आधारे नंदीबैलाचे चित्र काढा व त्याचे वर्णन करा.** (२.५.२)

**व्याकरण :** (६.५.१)

■ **क्रियापदांचे प्रकार**

आपण क्रियापद म्हणजे काय, हे मागील इयत्तेत शिकलो. आता आपण क्रियापदांचे प्रकार पाहू.

**(१) संयुक्त क्रियापदे**

खालील वाक्ये पाहा.

(१) कोकीळ झाडावर गातो.

(२) कोकीळ झाडावर गात आहे.

यांतील पहिल्या वाक्यात 'गातो' हे क्रियापद आहे. कारण 'गा' या धातूला 'तो' हा प्रत्यय लागून 'गातो' हा क्रियावाचक शब्द बनला व तो वाक्याचा अर्थ पूर्ण करतो. धातू म्हणजे क्रियापदाचे मूळ रूप. दुसऱ्या वाक्यातील 'गात' या शब्दात गाण्याचीच क्रिया आहे. 'गा' या धातूला 'त' हा प्रत्यय लागून 'गात' असा क्रियावाचक शब्द तयार झाला खरा; पण हा शब्द वाक्याचा अर्थ पूर्ण करत नाही. म्हणून 'गात' हा शब्द क्रियापद नव्हे. धातूला प्रत्यय लागून क्रिया अपुरी आहे असे दाखवणाऱ्या शब्दाला 'धातुसाधित' किंवा 'कृदन्त' असे म्हणतात. धातुसाधित याचा अर्थ धातूपासून तयार झालेला. 'गा' या धातूपासून 'गात, गाता, गाताना, गाऊ, गाऊन, गाणारा' अशी धातुसाधित रूपे तयार होतात.

'कोकीळ झाडावर गात आहे', या वाक्यात क्रिया गाण्याचीच आहे. या वाक्यात 'गात' हे क्रियापद नसून 'गात आहे' हे क्रियापद आहे. वाक्याचा अर्थ पूर्ण करण्यासाठी 'गात' या धातुसाधिताला 'आहे' या क्रियापदाने साहाय्य केले आहे. हे क्रियापद एका शब्दाचे नसून ते दोन शब्दांचे बनलेले आहे. **एक धातुसाधित व एक साहाय्य करणारे क्रियापद असे मिळून वाक्याचा अर्थ पूर्ण करणाऱ्या अशा क्रियावाचक जोडशब्दाला 'संयुक्त क्रियापद' असे म्हणतात.**

मुख्य धातूचे धातुसाधिताचे रूप व सहाय क्रियापद मिळून 'संयुक्त क्रियापद' तयार होते हे आपण पाहिले. या संयुक्त क्रियापदावरून एकाच क्रियेचा बोध झाला पाहिजे. 'वाचत आहे, जाणार नाही' या संयुक्त क्रियापदांवरून प्रत्येकात एकाच क्रियेचा बोध होतो. 'वानर झाडावर चढून बसले', या वाक्यात 'चढून बसले' हे संयुक्त क्रियापद नव्हे. त्यात एक क्रिया नाही. त्या दोन क्रिया आहेत : (१) चढण्याची व (२) बसण्याची. या दोन्ही क्रिया वेगवेगळ्या आहेत; म्हणून 'चढून बसले' हे संयुक्त क्रियापद नव्हे. पण 'वानर झाडावर चढत आहे', या वाक्यात 'चढत आहे' ही एकच क्रिया असल्यामुळे हे संयुक्त क्रियापद आहे.

(२) सहाय क्रियापदे

आता खालील वाक्ये पाहा.

| गट १ | गट २ |
|---|---|
| (१) मी पुस्तक वाचतो. | (१) मी पुस्तक वाचत आहे. |
| (२) मी मुंबईस जाईन. | (२) मी मुंबईस जाणार नाही. |

यातील पहिल्या गटातील क्रियापदे एका शब्दाची आहेत. म्हणजे 'वाचतो, जाईन' ही एकेरी क्रियापदे आहेत. दुसऱ्या गटातील क्रियापदे – 'वाचत आहे, जाणार नाही' ही दुहेरी किंवा संयुक्त क्रियापदे आहेत. पहिल्या गटातील क्रियापदांची रूपे धातूपासून बनलेली आहेत. दुसऱ्या गटात धातुसाधिताचे रूप व दुसरे एक क्रियापद वापरले आहे. धातुसाधितावरून मुख्य क्रिया कोणती हे समजले, तरी वाक्याचा अर्थ पूर्ण होत नाही. तो पूर्ण होण्यासाठी साहाय्य करणारे आणखी एक क्रियापद त्याच्या जोडीला वापरले आहे. अशा प्रकारे जे क्रियापद वाक्यातील मुख्य धातूच्या पुढे येऊन त्या वाक्याचा अर्थ पूर्ण करण्यास साहाय्य करते, त्याला **'सहाय क्रियापद'** असे म्हणतात.

- **वाचा आणि लक्षात ठेवा.**

एकच शब्द वा अक्षर पुन्हा पुन्हा येऊन म्हणजे पुनरुक्त होऊन तयार होणारे शब्द खालीलप्रमाणे लिहिले जातात.

**उदा. – हळूहळू, मुळूमुळू, तसूतसू, लुटूपुटू, दूरदूर, कधीकधी, अधूनमधून, बारीकसारीक.**

अशा प्रकारचे शब्द एखाद्या ध्वनीचे अनुकरण करणारे नादानुकारी असतील, तर ते खालीलप्रमाणे लिहिले जातात.

**उदा. – रुणुझुणु, तुरुतुरु, लुटलुटु, दुडुदुडु, झुळुझुळु.**



# १३. अखंड

**पाठपरिचय : महात्मा जोतिबा फुले** यांनी संतांच्या अभंगांप्रमाणेच पद्यरचना केली आहे. त्यास त्यांनी 'अखंड' असे संबोधले आहे. स्वार्थ सोडून जगहितासाठी सत्याने, न्यायाने वागावे आणि दीनदुबळ्यांना साह्य करून जगाला सुखी करावे असा बोध या अखंडातून दिला आहे.



( १ )

दृढ मनी धरी सद्विवेकास ।
तेच संतानास ॥ सुख देई ॥ १ ॥

जगहितासाठी सत्याने वर्तती ।
हित ते करीती ॥ स्वतःचेही ॥ २ ॥

आपहितासाठी मूढा नाडू जाता ।
त्याने तसे होता ॥ मग कसे ॥ ३ ॥

सद्विवेकाने तुम्ही करा न्याय ।
नसे पुढे भय ॥ जोती म्हणे ॥ ४ ॥

३.५.२/५.५.१, ५.५.२, ९.५.१

( २ )

उद्योग जो करी दीनबंधूसाठी ।
ममता ती पोटी ॥ मानवाच्या ॥ १ ॥

विद्या सर्वा देई सद्गुणाची हाव ।
करी नित्य कीव ॥ अज्ञानाची ॥ २ ॥

थकल्या भागल्या दीना साह्य करी ।
उद्योगास सारी ॥ जपूनीया ॥ ३ ॥

त्याच्या उद्योगास नित्य यश देई ।
जगा सुख देई ॥ जोती म्हणे ॥ ४ ॥

(९.५.१)

**सद्विवेक** - चांगला विचार

**संतान** - पुढील पिढी

**मूढ** - मूर्ख

**दीन** - गरीब

**वर्तन** - वागणे

**आपहित** - स्वतःचे हित

**नाडणे** - अडचणीत आणणे

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) जोतिबांच्या मते सद्विवेकामुळे कोणता फायदा होतो ?

(ब) आपल्या हितासाठी कोणती गोष्ट करू नये, असे जोतिबा सांगतात ?

(क) जोतिबांच्या मते विद्येची उपासना सर्वांनी का करावी ?

(ड) आपण कोणाकोणाला मदत करावी ?

(इ) आपल्या कामात आपल्याला यश केव्हा मिळते ?

२. **खालील प्रश्नाचे थोडक्यात उत्तर लिहा.** (५.५.२)

जोतिबांच्या मते जगाला सुखी करण्यासाठी आपण कसे वागावे आणि कसे वागू नये ?

३. **योग्य जोड्या लावा.** (९.५.१)

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) दृढ सद्‌विवेक | (अ) सद्‌गुणाची हाव |
| (ब) सत्याने वागणे | (ब) स्वउद्योगात यश |
| (क) विद्या | (क) संतानास सुख |
| (ड) दीना साह्य | (ड) जगाबरोबर स्वतःचेही हित |

४. **खाली दिलेला परिच्छेद वाचा व त्या अर्थाच्या कवितेतील ओळी सांगा.** (३.५.२, ५.५.१)

आपल्या फायद्यासाठी एखाद्या अज्ञानी, मूर्ख माणसाने आपल्याला अडचणीत आणले, तर त्या वेळी तुम्हांला काय वाटेल, याची जाणीव ठेवा आणि म्हणून आपल्या फायद्यासाठी कोणाही अज्ञानी वा मूर्ख माणसाला अडचणीत आणू नका. स्वार्थासाठी असे वागू नका.

५. **खालील वाक्यांतील रिकाम्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा.** (५.५.१)

(अ) विद्येमुळेच सर्वांच्या अंगी ............... वाढ होते.
(एकाग्रतेची/नम्रतेची/सद्‌गुणांची)

(ब) सद्‌विवेकाने न्याय करा, म्हणजे भविष्यकाळात कसलीही ............... राहत नाही. (आठवण/भीती/त्रुटी)

(क) जगात सत्याने वागावे, यात स्वतःचे ............... असते.
(हित/मोठेपण/शहाणपण)

(ड) जो इतरांचे कल्याण करतो, त्याच्या कामात त्याला ............... येते.
(स्मृती/गती/यश)



# १४. रेखाची रोजनिशी

लेखिका : लीला दीक्षित

**पाठपरिचय :** दैनंदिनी किंवा रोजनिशी लिहिण्याची सवय माणसाला जीवनाकडे बघण्याची नवी दृष्टी देते आणि माणसाच्या प्रगतीचा मार्ग सुकर करते. रोजच्या रोज लिहिलेली म्हणून ती दैनंदिनी. दिवसभरातील संपूर्ण घडामोडींतील नोंदी रोज रात्री झोपताना केलेल्या असतात, म्हणून तिला रोजनिशी म्हणायचे. आपण घेतलेले निर्णय, आपले विशिष्ट प्रसंगातील वर्तन, आपला स्वभाव, आपल्या सवयी इत्यादींच्या संदर्भात काय चुकले, काय बरोबर याचे योग्य ज्ञान यातून झाल्यामुळे चुका सुधारण्यासाठी मदत होते. यासाठी रोजनिशी लिहिण्याची गरज आहे. रेखाच्या रोजनिशीतील काही नोंदी या पाठात दिल्या आहेत.

रेखाच्या शाळेत नुकतेच स्नेहसंमेलन झाले होते. त्यासाठी आलेल्या प्रमुख पाहुण्यांनी आपल्या भाषणात सांगितले, की 'माणसाने आपली रोजनिशी लिहावी. मोठी माणसे रोजनिशी लिहीत असत. मागची पाने वाचून आपले काय चुकले हे आपले आपल्यालाच कळते. आपणच आपली चूक शोधली, तर आपल्यात चटकन प्रगती होते.'



रेखाला पाहुण्यांचे म्हणणे पटले. रेखाने ठरवले, आपण करून पाहूया तर प्रयोग ! तिने एक छान वही आणली आणि रोजनिशी लिहू लागली.

३.५.२/२.५.४, ४.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१

## ता. १४ जानेवारी १९९८

अंघोळ केल्यावर आईने माझ्या हातात तिळाच्या वड्यांचा डबा दिला. म्हणाली, "रेखा, तुझ्या साऱ्या बाईंकडे जा. त्यांना तिळगूळ दे आणि नमस्कार करून त्यांचे आशीर्वाद घे." मी आदल्या दिवशी रमाला आणि अनुला विचारले होते. अनू तर म्हणाली, "सारखा मोठ्यांना मान कशाला द्यायला हवा ? आणि बाई एवढ्या कोण मोठ्या लागून गेल्या."

आईला हे सांगितले तेव्हा आई ओरडली. म्हणाली, "रेखाऽ, त्या अनुला एकदा घरी घेऊन ये. मी सांगते तिला." पण मी अनुला कधी घरी आणतच नाही. आमचे दोन खोल्यांचे कुडमुडे घर ! तिला काय वाटेल ?

मला हल्ली कळतच नाही — आईचं खरं की अनूचं ? मनाचा फार गोंधळ होतो.

शेवटी तिळगुळाचा डबा घेऊन साऱ्या बाईंकडे जाऊन आले. मनाला खूप प्रसन्न वाटले !

## ता. १८ जानेवारी १९९८

गेले दोन-तीन दिवस मला ताप आला होता. आज बरे आहे. गुळाच्या पोळ्या खूप खाल्ल्या, असे आईचे म्हणणे. "खाण्यात विवेक हवा. भाजी, आमटी, कोशिंबीर सारं खायचं सोडून तू गूळपोळ्याच खात बसलीस, त्याचा हा परिणाम !" हे मात्र खरं ! आईचं ऐकलं नाही, त्याने मी आजारी पडले हे खरं आहे. अजून दोन दिवस मी शाळेत जाणार नाही. अशक्तपणा आला आहे.

आज सायंकाळी सानेबाई, मोरेबाई आणि पाटीलबाई मला भेटायला आल्या. येताना माझ्यासाठी त्यांनी छान गजरा आणला होता. बाई किती चांगल्या आहेत ! माझ्यावर खूप प्रेम करतात. अनू वेडीच आहे. म्हणे तिळगूळ देऊन बाईंचा आशीर्वाद कशाला घ्यायला

हवा ? हवाच घ्यायला. आपल्यावर प्रेम करणाऱ्या माणसांचा आशीर्वाद घ्यायलाच हवा. त्यात लाज कसली !

• **ता. २१ जानेवारी १९९८**

आज वर्गात नोटीस आली होती. सातव्या इयत्तेतील सुमित्रा जाधवच्या हृदयावर शस्त्रक्रिया करायची आहे. सर्वांनी आर्थिक मदत द्यावी म्हणून. सुमित्राला मी पाहिलेलेही नाही, पण खूप वाईट वाटले. आईला सांगायला हवे !

• **ता. २२ जानेवारी १९९८**

काल सुमित्रा जाधवबद्दल आईला सांगितले. आईने ताबडतोब शंभर रुपये मला दिले. मला आश्चर्याचा धक्काच बसला. आई पैशाची फार काटकसर करते. परवा रमाचा वाढदिवस झाला, तर मला फक्त १५ रुपयांचे एक पुस्तक आणून दिले. तेव्हा आईचा राग आला होता; पण आज शंभर रुपये कसे दिले बुवा ! आईला उद्या विचारायलाच हवे.

• **ता. २३ जानेवारी १९९८**

आज आमच्या वर्गात साऱ्यांनी पैसे दिले. आमच्या वर्गाचे ५१५ रुपये जमले. कुणी वीस, कुणी पंचवीस रुपये दिले. एवढी मोठ्ठी श्रीमंत अनुपमा तिने चक्क, 'बाई विसरले' म्हणून सांगितले. कदाचित दुसऱ्याला मदत करणे तिला आवडत नसावे. मीच सर्वांत जास्त पैसे दिले असावे. आईने बजावले होते. आपण किती पैसे देतो ते मैत्रिणींना सांगत फिरायचे नाही.

रात्री आईला शंभर रुपयांबद्दल विचारले, तेव्हा ती हसली. म्हणाली, "सुमित्रासाठी शंभर रुपये दिले, ते खरे म्हणजे कमीच आहेत."

मी म्हटलं, "कमी ?"

आई म्हणाली, "आज सुमित्राच्या जन्ममरणाचा प्रश्न आहे,

म्हणून प्रत्येकाने जास्तीत जास्त मदत करायला हवी.''

''अग, पण सुमित्राला आपण ओळखतही नाही आणि रमा तर माझी जिवलग मैत्रीण आहे.''

''ओळखायला कशाला हवं ? प्रत्येक माणसाचं प्रत्येक माणसाशी न ओळखताही एक घट्ट नातं असतं. याचंच नाव माणुसकी. ते जपण्यातच माणसाचं मोठेपण आहे आणि असं माणुसकीनं दिलेलं देणं हीच खरी आपली संपत्ती.''

आई किती छान बोलली ! त्याचाच विचार करत मी अंथरूणात पडले आहे.

## • ता. १ फेब्रुवारी १९९८

१५ फेब्रुवारीला आईचा वाढदिवस आहे. मी माझ्या खाऊच्या पैशांतून आईसाठी छान पिशवी भरणार आहे. सानेबाई मला खूप आवडतात. त्या म्हणाल्या, ''मी तुला कापड आणून देते. रेशीमही देते. मी शिकवीन तुला भरतकाम.'' आईच्या नकळत हे करायला हवं. त्यातच गंमत आहे. रोज शाळा सुटल्यावर मी अर्धा तास बाईंकडे थांबणार आहे. आईला सांगितले, ''मी अर्धा तास उशिरा येईन, सानेबाईंकडे जाणार आहे.''

''कशासाठी ?'' आईने विचारले.

''आहे आमची गंमत !'' मी म्हणाले.

सानेबाईंकडे जाणार आहे म्हटल्यावर आईने लगेच परवानगी दिली.

## • ता. १४ फेब्रुवारी १९९८

उद्या आईचा वाढदिवस. माझी भरतकामाची पिशवी आज पूर्ण झाली. सानेबाईंनी पिशवी शिवायलाही शिकवलं. आई रागावली, की तिचा मला राग येतो खरा, पण मला ती फार आवडते. उद्या

*सकाळी तिच्या उशाशी गुलाबाचे फूल आणि ही पिशवी मी ठेवणार आहे. खूप आनंद होईल तिला.*

- **ता. १५ फेब्रुवारी १९९८**

*सकाळी आई उठली. माझी पिशवी आणि फूल पाहून इतकी खूश झाली, की तिच्या डोळ्यांत आनंदाश्रू उभे राहिले. मला तिने जवळ घेतले. किती बरे वाटते अशा वेळेला. ती म्हणाली, "रेखा, तुझी पिशवी सुंदरच आहे. स्वतःच्या कष्टाने छोटी वस्तू जरी दुसऱ्याला दिली तरी तिचे मोल खूप असते. तू फार गुणाची होत चाललीस हल्ली."*

*मी आईला बिलगले. म्हटलं, "आई तुला आठवते, मी हल्ली रोजनिशी लिहिते ते ? त्यातील मागील पाने वाचून माझे मलाच समजते मी काय चुका करते ते !"*



आईने रेखाला जवळ घेतले; तिच्या हातात एक सोनेरी अक्षर असलेली छान दैनंदिनी दिली आणि म्हणाली, "छान आहे हा उपक्रम ! या दैनंदिनीत प्रत्येक दिवसाला स्वतंत्र पान आहे. रेखा, कायम रोजनिशी लिही."

रेखाने उठून आईला नमस्कार केला. तिचा वाढदिवस होता ना ! नमस्कार करता करता ती मनात म्हणाली, 'आता रमालापण सांगायचं रोजनिशी लिहायला.'



## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) रोजनिशी लिहिण्याचे कोणते फायदे प्रमुख पाहुण्यांनी सांगितले ? किंवा रोजनिशी लिहिण्याचे रेखाने का ठरवले ?

(ब) 'खाण्यात विवेक हवा' असे आई का म्हणाली ?

(क) 'सुमित्रासाठी शंभर रुपये दिले, ते खरे म्हणजे कमीच आहेत,' असे आई का म्हणाली ?

(ड) माणसाचे मोठेपण कशात आहे ?

(इ) आईच्या डोळ्यांत आनंदाश्रू का उभे राहिले ?

२. **खालील प्रश्नांची प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) आईच्या वाढदिवसाला भेट देण्यासाठी रेखाने काय केले ?

(ब) 'आपल्यावर प्रेम करणाऱ्या माणसांचा आशीर्वाद घ्यायला हवा,' असे रेखाला का वाटले ?

३. **रोजनिशी लिहिण्यामुळे रेखाच्या विचारात कोणते बदल झाले, याचा शोध घेऊन त्याची वहीत नोंद करा.** (५.५.२)

४. **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)

आश्चर्याचा धक्का बसणे, काटकसर करणे, डोळ्यांत आनंदाश्रू उभे राहणे, मनाचा गोंधळ होणे.

## उपक्रम

- **या पाठाच्या आधारे आई व रेखा या दोघींतील संवाद वर्गात सादर करा.** (२.५.४)
- **तुम्ही रोजनिशी लिहा. प्रत्येक महिन्याच्या शेवटी ती शिक्षकांना दाखवा. घरी पालकांना दाखवा.** (४.५.३)

**व्याकरण :** (६.५.१)

**(३) प्रयोजक क्रियापदे**

खालील वाक्ये पाहा.

(१) विद्यार्थी बाकावर बसला.

(२) गुरुजींनी विद्यार्थ्यास बाकावर बसवले.

या दोन्ही वाक्यांतील क्रियापदांतील धातू 'बस' हा आहे. पहिल्या वाक्यात बसण्याची क्रिया 'विद्यार्थी' करतो. दुसऱ्या वाक्यात ही क्रिया गुरुजी विद्यार्थ्याला करावयास लावतात, म्हणजे कर्ता हा क्रिया करणारा नसून तो ती क्रिया दुसऱ्याकडून करवतो. 'दुसऱ्याकडून करवणे' याला 'प्रयोजक' हा शब्द आहे. म्हणून अशा प्रकारच्या धातूंना प्रयोजक धातू म्हणतात व त्यांच्यापासून तयार झालेल्या क्रियापदांना **'प्रयोजक क्रियापदे'** म्हणतात. उदाहरणार्थ –

| साधे क्रियापद | प्रयोजक क्रियापद |
|---|---|
| पडतो | पाडतो |
| हसतो | हसवतो |
| आणतो | आणवतो |
| करतो | करवतो |

साध्या क्रियापदावरून क्रिया कर्ता स्वतः करत आहे असे कळते; पण प्रयोजक क्रियापदावरून क्रिया दुसऱ्याकडून करवून घेतली जात आहे, असे कळते.

**(४) शक्य क्रियापदे**

खालील वाक्ये पाहा.

(१) त्याला आता घरी जाववते.

(२) मला दहा मैल चालवते.

(३) तिला मोटारीत सहा तास बसवते.

यांतील **क्रियापदांवरून कर्त्याला ती क्रिया करण्याची शक्यता किंवा सामर्थ्य आहे, असा बोध होतो.** अशा क्रियापदांना **'शक्य क्रियापदे'** असे म्हणतात. 'जाववते, चालवते, बसवते' ही शक्य क्रियापदे होत. कारण क्रियापदांवरून कर्त्याला जाण्याची, चालण्याची किंवा बसण्याची शक्यता आहे, असे कळते.

क्रियापदाचे खालील प्रकार आपण पाहिले.

(१) सहाय, (२) संयुक्त, (३) प्रयोजक व (४) शक्य.

## अभ्यास

**(१) खालील धातुसाधिते वापरून संयुक्त क्रियापदे बनवा व ती वाक्यांत वापरा.**

धावत, नेऊ, ठेवत, जाऊ, करत.

**(२) खालील धातूंची प्रयोजक रूपे वाक्यांत वापरा.**

निजणे, भरणे, घेणे, देणे, लिहिणे, मारणे, बसणे.

**(३) क्रियापद ओळखून प्रकार लिहा.**

पडतो, हसते, बसवते, वाचत आहे.

**वाचा आणि लक्षात ठेवा.**

लिहिताना आणि वाचताना **'न'** आणि **'ण'** यांची नेहमीच गल्लत होते.

**शेवटी 'ण' अक्षर येणारे शब्द –**

उच्चारण, कारण, ग्रामीण, पोषण, भक्षण, दूषण, निर्माण, खूण, परीक्षण.

**शेवटी 'न' अक्षर येणारे शब्द –**

पठन, खंडन, मंडन, दर्शन, वेष्टन, खून, विसर्जन, प्रयोजन, कीर्तन.




# १५. आम्ही महाराष्ट्रकन्या


**कवयित्री : पद्मा गोळे**

**पाठपरिचय :** स्वर्गाहून श्रेष्ठ वाटणाऱ्या मातृभूमीचे, मातृभाषा मराठी विषयीचे जाज्वल्य प्रेम मुलांच्या मनात निर्माण व्हावे, असे या कवितेतील वर्णन आहे. भक्तीची पहाट जागवणाऱ्या मुक्ताई, जनाई आणि स्वातंत्र्याची शिकवण देणाऱ्या जिजाई, लक्ष्मीबाई या महाराष्ट्रकन्या होत. यांच्याविषयीचा अभिमानही या कवितेतून सहजपणे व्यक्त झाला आहे.

आम्ही महाराष्ट्रकन्या
माय मराठी आमुची;
स्वर्गाहुनीहि आम्हांला
माया मराठी भूमीची.



काळा सह्याद्रीचा कडा
कळसूबाईचे शिखर
कृष्णाभीमागोदेसंगे
आहे आमुचे माहेर.

३.५.२/१.५.१, ४.५.१, ५.५.१, ५.५.२, ९.५.१





मुक्ता, जना जागविती
भोळ्या भक्तीने पहाटे,
जिजा, लक्ष्मी शिकविती
आम्हां स्वातंत्र्याची गीते.

म्हणा कळ्या या जाईच्या
परी मायभूमीसाठी
करू हातांचीहि ढाल
बाळ बांधूनिया पाठी.



अवघ्या भारताची सेवा
बाणा आमुचा मराठी,
प्राण तळहातावरी
सर्वांसाठी देशासाठी.

(९.५.१)

**हाताची ढाल करणे** - शस्त्राशिवाय लढणे, प्रसंगाला सामोरी जाणे

**बाणा** - जन्मस्वभाव, मूळ स्वभाव

**प्राण तळहातावर घेणे** - जीवावर उदार होणे, प्राणाची पर्वा न करणे



## स्वाध्याय



१. **खालील प्रश्नांची उत्तरे सांगा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) कवयित्रीला स्वर्गाहून प्रिय काय वाटते ?

(ब) आपल्याला पहाटे कोणत्या महाराष्ट्रकन्या जागवतात ?

(क) आपल्याला स्वातंत्र्याची गीते कोण शिकवत आहेत ?

२. **खालील पद्यपंक्तींचा अर्थ स्पष्ट करा.** (५.५.१)
अवघ्या भारताची सेवा
बाणा आमुचा मराठी,
प्राण तळहातावरी
सर्वांसाठी देशासाठी.

३. **खालील ओळी इतिहासातील कोणत्या व्यक्तीच्या पराक्रमाची आठवण करून देतात ?** (५.५.१)
करू हातांचीही ढाल, बाळ बांधुनिया पाठी ।

४. **आपणा सर्वांना अभिमान वाटेल अशा कोणकोणत्या व्यक्तींचा आणि ठिकाणांचा उल्लेख या कवितेत आला आहे ?** (५.५.२)

५. **समानार्थी शब्द सांगा व त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१, ९.५.१.)
कन्या, माय, पहाट, भूमी, हात.

६. **या कवितेस योग्य चाल लावून साभिनय सादर करा. ऐका.** (१.५.१)

७. **खालील अर्थाच्या कवितेतील ओळी सांगा.** (५.५.१)
आम्हांला आमची मायमराठी भूमी खूप आवडते.



## उपक्रम



- **'मातृभाषा आणि मायभूमी' यांबद्दलचा स्वाभिमान जागवणाऱ्या कविता मिळवून वाचा व आपल्या वहीत लिहा.** (३.५.३, ४.५.१)
- **'महाराष्ट्राचे लोकजीवन' याविषयी चित्र प्रदर्शन भरवा.**
मुक्ताबाई, जिजाबाई, जनाबाई यांच्याबद्दल माहिती मिळवा.



# १६. किरण बेदी

**पाठपरिचय :** 'आय डेअर' या इंग्रजी पुस्तकाचा मराठी अनुवाद **आशा कर्दळे** यांनी केला असून त्यातील एक उतारा खाली दिला आहे.

एक स्त्री पोलीस अधिकारी म्हणून किरण बेदी यांच्या यशस्वी आणि तेजस्वी कर्तृत्वाची स्फूर्तिदायक माहिती सदर पाठात आली आहे.



२६ जानेवारी, १९७३.

राजधानी दिल्लीमधील भव्य आणि प्रासादतुल्य राष्ट्रपतीभवनाकडे जाणारा राजपथ विशेष सुशोभित करण्यात आला होता. सैनिकांच्या कवायती, संचलने, प्रात्यक्षिके आणि प्रत्येक राज्याचे सांस्कृतिक दर्शन घडवणाऱ्या रथांची भव्य मिरवणूक अशा विविध कार्यक्रमांचे आयोजन केलेले होते.

१.५.२/२.५.४, ३.५.३, ४.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ९.५.१

त्यावर्षी दिल्ली पोलिसांच्या बक्षिसपात्र तुकडीच्या संचलनाचे नेतृत्व एक स्त्रीं अधिकारी करत होती. पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी एका स्त्री पोलीस अधिकाऱ्याच्या नेतृत्वामुळे प्रभावित झाल्या. त्यांनी ताबडतोब आपले मदतनीस आणि शरीररक्षक यांचे तिच्याकडे लक्ष वेधले. दुसऱ्या दिवशी तिला पंतप्रधानांकडील नाश्त्याचे निमंत्रण आले !

ती स्त्री म्हणजे श्रीमती किरण बेदी ! दिल्लीच्या उपविभागीय पोलीस अधिकारी !

नवी दिल्लीतल्या चाणक्यपुरी येथे त्यांची नियुक्ती उपविभागीय पोलीस अधिकारी म्हणून झाली होती.

वास्तविक किरण बेदींना अगदी ऐनवेळी कळले होते, की त्यांना संचलनाचे नेतृत्व करता येणार नाही. त्यांनी लगेच तेव्हाच्या दिल्ली पोलीसच्या महानिरीक्षकांकडे धाव घेतली आणि विचारले, ''सर, मी संचलनाचे नेतृत्व करायचे नाही असे सांगण्यात आले आहे, ते खरे आहे ?''

''हे बघ किरण, हे पंधरा किलोमीटरचे संचलन आहे आणि हातात अवजड तलवार घेऊन ते तुला करावे लागेल. जमेल तुला ते ?''

''सर, इतके सगळे प्रशिक्षण पुरुषांच्या बरोबरीने घेतल्यानंतर अद्यापही मी या प्रश्नाचे उत्तर द्यावे, अशी तुमची अपेक्षा आहे ?'' आश्चर्यचकित होऊन तिने विचारले.

अखेर त्यांना संचलनाचे नेतृत्व करायला मिळाले. यावेळी किरणचे वय होते अवघे चोवीस वर्षांचे !

लहानपणापासूनच किरण अतिशय जबाबदारीने वागत असे. किरणची शाळा घरापासून १६ किलोमीटर दूर होती, त्यामुळे जाण्यायेण्यात बराच वेळ जायचा. दररोज सकाळी लवकर उठावे लागायचे आणि वाहनावर जास्तीचा खर्चही व्हायचा. आई पहाटे चारलाच उठून कामाला लागायची. सकाळी लवकर नाश्ता करून शशी आणि किरण या दोघी बहिणी

५ किलोमीटर अंतरावर असलेल्या बस स्टँडवर चालत किंवा कधी पळत जायच्या. लहान वयातच किरणने मनाशी निर्धार केला, की आईवडील आपल्यासाठी खर्च करतात, त्याचा योग्य उपयोग करून घेतला पाहिजे. शाळेतल्या प्रत्येक उपक्रमात तिने हिरीरीने भाग घेतला. स्वतःला त्यात बुडवूनच घेतले. ती टेनिस स्पर्धांमध्ये होती, एन.सी.सी.मध्ये होती. भाषणे, वादविवाद स्पर्धा, नाटके, क्रीडा असे एकही क्षेत्र तिने सोडले नाही. ग्रंथालयाचा तर ती जास्तीत जास्त उपयोग करायची. वेळेचा जास्तीत जास्त सदुपयोग करून घेण्याची विलक्षण ओढ तिला होती. अर्धा तास जरी रिकामा मिळाला, तरी ती लगेच चित्रे काढायला बसायची किंवा रॅकेट उचलून टेनिसकोर्टवर खेळायला पळायची. खेळायला कोणी मिळाले नाही, तर भिंतीवर रॅकेटने चेंडू मारून खेळाचा सराव करायची.

कॉलेजमधले तास संपले, की किरण सायकलवरून घरी परत जायची. थोडा वेळ आईबरोबर घालवायची आणि एन.सी.सी.चा गणवेश घालून पुन्हा कॉलेजला जायची. आईवर तिचे अतिशय प्रेम होते. त्या दिवसांमध्ये केवळ काही क्षण आईला भेटण्यासाठी ती भर उन्हात सायकल चालवत बारा किलोमीटर अंतर कापून घरी यायची. कॉलेजमधले दिवस अत्यंत धावपळीचे, परिश्रमाचे, शिस्तीचे आणि नियमित अभ्यासाचे होते. किरणने निश्चय केला होता. 'एक दिवस मी असे काहीतरी करून दाखवीन, की ज्याची भारतीय स्त्रीकडून कधी अपेक्षाच केली गेली नव्हती.'

श्रीमती किरण बेदींचे आईवडील स्वतंत्र आणि पुरोगामी विचारांचे होते. त्यांनी तिला स्वतंत्र आणि समानतेचे विचार करायला शिकवले, तसेच स्वतःची पात्रता वाढवायलाही शिकवले; त्यामुळेच श्रीमती किरण बेदी शाळेत तसेच टेनिसमध्ये सर्वोत्कृष्ट ठरल्या: १९७२ मध्ये वयाच्या तेविसाव्या वर्षी त्यांनी 'आशियाई महिला लॉन टेनिस'चे अजिंक्यपद मिळवले. त्यांनी महाविद्यालयातही यश मिळवले; उच्च पदवी घेतली.

इंग्रजी विषयात बी. ए. झाल्यानंतर त्यांनी कायद्याचा अभ्यास केला. त्याचवर्षी त्यांनी पोलीस अकादमीत प्रवेश घेतला. भारतीय पोलीस सेवेत प्रवेश करणारी पहिली महिला म्हणून १९७४ मध्ये त्यांना सन्मानित करण्यात आले. प्रथम त्यांची दिल्लीत नेमणूक झाली. त्यानंतर त्या भराभर वरच्या श्रेणींमध्ये चढत गेल्या.

५ नोव्हेंबर, १९७९ रोजी दिल्लीच्या राजपथावर एक भयचकित करणारे नाट्य घडले. तलवारी उपसून युद्धाच्या आरोळ्या देत एक चिडलेला जमाव चालून येत होता. जमावाला रोखण्यासाठी दिल्ली पोलिसांचे एक पथक किरण बेदींच्या नेतृत्वाखाली निघाले होते. मोर्चातून पुढे धावणाऱ्यांना थोपवण्यासाठी किरण बेदी जोरजोरात ओरडत होत्या. मोर्चाने उलट पोलीस पथकावरच हल्ला केला. पथकातले इतर पोलीस घाईने माघार घेऊ लागले, तेव्हा किरण बेदी स्वतःच लाठीहल्ला करत समुदायावर तुटून पडल्या. त्यावेळी त्यांच्या डोक्यावर फक्त हेल्मेट होते आणि हातात पोलिसांची नेहमीची लाठी. त्यावेळी त्यांच्यावर सतत प्रहार होत होते, तरीही त्यांनी असामान्य धैर्य दाखवले आणि न थांबता सतत त्या हल्ला करत राहिल्या. त्यांचे ते विलक्षण शौर्य आणि निर्धार पाहून जमावातील निदर्शकांचा आवेश ओसरला. तेवढ्यात त्यांच्या मदतीला त्यांचे पोलीस पथक आले आणि त्यांनी परिस्थिती नियंत्रणाखाली आणली.

पोलीस म्हणून त्यांचे जे काम होते, त्याहीपेक्षा अधिक शौर्याचे असे हे कृत्य त्यांनी केले होते; म्हणूनच १० ऑक्टोबर, १९८० रोजी त्यांना 'पोलीस मेडल फॉर गॅलंट्री' हे शौर्यपदक प्रदान करण्यात आले आणि 'वुमन ऑफ द इयर' म्हणूनही घोषित केले गेले.

१९९३ साली श्रीमती बेदी दिल्लीच्या तिहार कारागृहाच्या महानिरीक्षक झाल्या. भारतातले ते सर्वांत मोठे तुरुंग-संकुल. खचाखच दाटीवाटीने भरलेल्या त्या तुरुंगामध्ये आठ हजारांपेक्षा जास्त कैदी राहतात.

श्रीमती बेदींनी बघता बघता तिहार जेलचे स्वरूप पालटून टाकले. आज तिथले कैदी काम, अभ्यास, खेळ यांसारख्या विधायक कार्यांत गुंतलेले आहेत. निरक्षर लोक लिहायला-वाचायला शिकत आहेत. काही उच्च पदव्या घेत आहेत. तुरुंगातल्या कारखान्यांमध्ये कैदी कौशल्याची कामे करून पैसे कमावतात व ते तिहारच्या नव्या बँकेत जमा करतात. मनोरंजनाचे कार्यक्रम करतात, खेळांचे आयोजन करतात.

श्रीमती बेदींच्या कामाचे स्वरूप असे अभिनव आहे. १९९४ सालच्या रेमन मॅगसेसे पुरस्कारासाठी श्रीमती किरण बेदींची निवड झाली. किरण बेदींनी कारागृहात केलेल्या सुधारणा, व्यसनी लोकांचे पुनर्वसन, गुन्हेगारीचे नियंत्रण हे निवड मंडळाला अतिशय प्रशंसनीय वाटले. तसेच स्वतःच्या उत्स्फूर्त व क्रियाशील नेतृत्वामुळे किरण बेदींनी भारतीय पोलिसांमध्ये जो आत्मविश्वास निर्माण केला, तोसुद्धा मंडळाला फार मौलिक वाटला.

वयाच्या पंचेचाळीस वर्षांनंतरही श्रीमती बेदी यांच्यापाशी पूर्वीचाच उत्साह, स्पर्धात्मक वृत्ती, शिस्त आणि आत्मविश्वास टिकून आहे. त्या कामे करायला अधीर आहेत. त्या म्हणतात, ''प्रवाहाविरुद्ध पोहणे फार कठीण असते, पण त्यामुळेच जिथे कुणीही जाऊ शकत नाही अशा ठिकाणी अखेर तुम्ही पोहोचता.''

---

(९.५.१)

**प्रासादतुल्य** - राजवाड्यासारखा

**पुरोगामी** - आधुनिक विचाराचा दृष्टिकोन; प्रगतिशील; पुढे जाणारा

**तुरुंग-संकुल** - अनेक छोट्या तुरुंगांचा एक समूह

**अभिनव** - अगदी नवीनच

**पुनर्वसन** - पुन्हा नव्याने चांगल्या प्रकारचे जीवन जगण्याची संधी उपलब्ध करून देणे.

**नियंत्रण** - योग्य वळण देणे, ताब्यात ठेवणे

**N.C.C.** - नॅशनल कॅडेट कोअर / राष्ट्रीय छात्र सेना

**उत्स्फूर्त** - स्वतःहून एखादी गोष्ट करणे **क्रियाशील** - कृतिवर भर देणारे **रेमन मॅगसेसे पुरस्कार** - 'फिलिपिन्स' येथील रेमन मॅगसेसे फौंडेशनच्या वतीने हा पुरस्कार सरकारी नोकरीत आणि वेगवेगळ्या क्षेत्रांत उत्कृष्ट काम करणाऱ्यांना दिला जातो.



## स्वाध्याय



१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) २६ जानेवारी १९७३ च्या संचलनातील कोणाच्या नेतृत्वामुळे पंतप्रधान इंदिरा गांधी प्रभावित झाल्या ?

(ब) किरण बेदी यांना संचलनाचे नेतृत्व करणे अवघड जाईल, असे महानिरीक्षकांना का वाटले ?

(क) कॉलेजमध्ये असताना किरण बेदींनी कोणता निश्चय केला ?

(ड) १९९४ साली किरण बेदींना कोणता पुरस्कार मिळाला ?

(इ) भारतीय पोलीस सेवेत प्रथम प्रवेश करणारी स्त्री कोण ?

२. **खालील प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) किरण बेदींना संचलनाचे नेतृत्व करायला केव्हा व कसे मिळाले ?

(ब) किरण बेदी लहानपणी शाळेत कोणकोणत्या उपक्रमांत सहभागी होत ?

(क) वेळेचा चांगला उपयोग करून घेण्याची ओढ किरण बेदींना होती, हे आपल्याला कशावरून समजते ?

(ड) दिल्लीच्या राजपथावर ५ नोव्हेंबर १९७९ ला कोणता नाट्यमय प्रसंग घडला ?

(इ) किरण बेदींनी तिहार जेलचे स्वरूप कसे पालटले ?

३. **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)

धाव घेणे, स्थायिक होणे, आयोजन करणे,
निर्धार करणे, आवेश ओसरणे, प्रवाहाविरुद्ध पोहणे.



## उपक्रम



- **आपल्या देशातल्या स्त्रिया सकाळी उठल्यापासून रात्रीपर्यंत खूप कामे करतात. तुमच्या परिसरातील अशा स्त्रियांच्या कामाचे निरीक्षण**

**करा, त्याविषयी त्यांच्याशी बोला. त्यांच्या कामांचे आठ-दहा वाक्यांत वर्णन लिहा.** (८.५.१, ४.५.३)

- **तुमच्या परिसरातील एखाद्या कर्तबगार स्त्रीविषयी माहिती मिळवा आणि वर्गात सांगा.** (२.५.४, ८.५.१)
- **खालील स्त्रियांची जीवनचरित्रे मिळवून वर्गात वाचन करा.** (३.५.३)

(अ) झाशीची राणी लक्ष्मीबाई, (ब) हेलन केलर,
(क) इंदिरा गांधी, (ड) पी. टी. उषा

**व्याकरण :** (६.५.१)

क्रियापदांचे सकर्मक व अकर्मक असे आणखी दोन प्रकार आहेत.

**सकर्मक क्रियापद**

ज्या क्रियापदाचा अर्थ पुरा होण्यास कर्माची जरुरी असते त्यास **सकर्मक क्रियापद** म्हणतात. जसे – 'गवळी दूध विकतो', या वाक्यात विकणारा कोण ? 'गवळी'. 'गवळी' हा कर्ता. विकण्याची क्रिया कोणावर घडते ? 'दूध' या शब्दावर. म्हणून 'दूध' हे कर्म. 'गवळी विकतो' एवढ्यावरून वाक्याचा अर्थ पूर्ण होत नाही. तो पूर्ण होण्यास 'दूध' या कर्माची जरुरी आहे. म्हणून 'विकतो' हे सकर्मक क्रियापद होय.

**अकर्मक क्रियापद**

ज्या क्रियापदाचा अर्थ पुरा होण्यास कर्माची जरुरी नसते त्यास **अकर्मक क्रियापद** म्हणतात.

**अभ्यास**

**खालील वाक्यांतील क्रियापदे सकर्मक की अकर्मक ते सांगा.**

(१) त्यांनी मला घरी पोचवले.
(२) गांधीजी खूप प्रवास करत.





# १७. विद्यार्थ्याप्रत



**कवी : केशवसुत (कृष्णाजी केशव दामले)**

**पाठपरिचय :** जगात अनेक गोष्टी महत्त्वाच्या आहेत, पण त्या सर्वांहून महत्त्वाची अनेक रहस्ये विद्यार्थ्यांमध्ये दडलेली आहेत. ती या कवितेतून शोधायची आहेत.

महत्त्व भारी आहे या पृथ्वीचे,
त्याहुनि अतिशय या सगळ्या विश्वाचे
परि तुजमध्ये महतीचे जे बीज
त्याहुनि काही मोठी नाही चीज –
ठसव मनी हे साचे,
बाबा !
हे वच बहु मोलाचे.

अग्नि असे हा तेजस्वी रे फार,
त्याहुनि भारी सूर्य नभीचा थोर;
परि किरण जो तुजमध्ये सत्याचा
प्रकाश सर्वोत्तम तो आहे त्याचा;
घोक सदा हे वाचे,
बाबा !
हे वच बहु मोलाचे.

३.५.२/३.५.३, ४.५.१, ५.५.१, ५.५.२, ७.५.१, ९.५.१

पृथ्वीमध्ये रत्ने बहु आहेत;
आकाशी तर असंख्य दिसताहेत;
परि एक रत्न तुजमध्ये जे सच्छील
कोणाला नच सर त्याची येईल; –
स्मरण असू दे याचे,
बाबा !
हे वच बहु मोलाचे.

स्नायूंमध्ये पुष्कळ आहे शक्ति,
नृपवेत्री तर फारच आहे म्हणती;
परि एक एक जो नवा शब्द तू शिकसी
शक्ति तयाची उलथिल सर्व जगासी ! –
पठन तर करी त्याचे,
बाबा !
जग हे बदलायाचे.

---

(१.५.१)

**महती** - मोठेपणा
**चीज** - वस्तू
**साचे** - खरोखर
**वच** - बोल, शब्द
**सच्छील** - चांगले चारित्र्य
**नृपवेत्री** - नृप म्हणजे राजा, वेत्र म्हणजे वेत. इथे राजाच्या हातातील कायदा, शासन असा अर्थ

---

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) पृथ्वीपेक्षा अधिक महत्त्व कोणाचे आहे ?
(ब) सर्वांत अधिक महत्त्वाचे काय आहे ?

(क) अग्नीपेक्षा तेजस्वी कोण आहे ?

(ड) सर्वोत्तम प्रकाश कशाचा आहे ?

(इ) सर्व रत्नांत उत्तम असे रत्न कोणते ?

(फ) हे सर्वोत्तम रत्न कोणाजवळ आहे ?

(ग) सर्वशक्तिमान असे काय आहे ?

२. **खालील वाक्यांतील रिकाम्या जागी कंसांतील योग्य शब्द भरा.** (५.५.१)

(अ) सत्य हे सर्वांत ............. आहे. (भरलेले/महाबीज/तेजस्वी)

(ब) ............. बीज हे माणसात लपलेले असते.
(मोठेपणाचे/सर्वव्यापी/मानवतेचे)

(क) ............. हे माणसाजवळचे बहुमोल रत्न आहे.
(उत्तम शरीरयष्टी/उत्तम डोळे/उत्तम शील)

(ड) कवीने आकाशातील ताऱ्यांना ............. म्हटले आहे.
(हिरे/रत्ने/ग्रहगोल)

(इ) ............. जगाला उलथवण्याचे सामर्थ्य आहे.
(शक्तीत/डोळ्यांत/शब्दांत)

३. **खालील शब्द दिलेल्या नमुन्याप्रमाणे तक्त्यात योग्य ठिकाणी भरा.** (५.५.१)
सूर्य, नृपवेत्री, माणसाचे सच्छील, माणसाने मिळवलेले ज्ञान, पृथ्वी, असंख्य तारे, स्नायूतील शक्ती, माणसातील मोठेपणाचे बीज, माणसातील सत्याचा किरण, रत्ने, विश्व, अग्नी.

| पृथ्वी | विश्व | माणसातील मोठेपणाचे बीज |
|---|---|---|
| अग्नी | | |
| रत्ने | | |
| स्नायूतील शक्ती | | |

४. **खालील अर्थांच्या कवितेतील ओळी सांगा.** (५.५.१)
परंतु तुझ्यात मोठेपणा सूक्ष्मरूपाने आहे.
त्याची बरोबरी कोणालाच करता येणार नाही.

५. **'खूप' या अर्थाचे कवितेत आलेले शब्द सांगा.** (९.५.१)

६. **खालील शब्दांच्या उलट अर्थाचे शब्द सांगा व त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१, ९.५.१)
स्मरण, थोर, सत्य, प्रकाश, बहू.

७. **खालील शब्दांच्या समान अर्थाचे शब्द सांगा व त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१, ९.५.१)
पृथ्वी, सूर्य, अग्नी, नभ.

८. **संत रामदासांच्या श्लोकांचा संग्रह करा. वर्गात वाचून दाखवा.** (३.५.३)

९. **विद्यार्थ्यांस बजावून सांगणाऱ्या कवितेतील ओळी सुवाच्य अक्षरांत लिहा.** (४.५.१)
जसे – ठसव मनी हे साचे

---

- **वाचा आणि लक्षात ठेवा.**
ज्या अक्षराचा उच्चार नाकातून स्पष्टपणे होतो, त्या अक्षरावर अनुस्वार किंवा शीर्षबिंदू दिलेला असतो.
उदा. घंटा, तंटा, चिंच, आंबा, सुंठ, कोंबडा, कुंकू, गंगा, कंकण, निबंध, अभिनंदन.

---

# १८. अडई आणि तिची पिले

**लेखक : मारुती चितमपल्ली**

**पाठपरिचय :** अडई व तिच्या पिलांचे निरीक्षण करताना आलेल्या एका सुखद अनुभवाचे वर्णन या पाठात लेखकाने केले आहे. निसर्ग व प्राणी-पक्ष्यांविषयी प्रेम बाळगणे आणि भूतदयेचे मूल्य विद्यार्थ्यांच्या मनात रुजवणे यासाठी उपयुक्त असा पाठ.

रंगाने तांबूस, तपकिरी आणि चमकणारे लालसर डोळे असलेल्या अडई पक्ष्याला रानबदक असेही म्हणतात. देवधानात रात्रभर चरण्यासाठी अडया थव्याथव्याने उतरतात. नवेगाव सरोवराच्या बांधावर आपल्या चोचींनी पंख साफ करत त्या उभ्या असतात. झिंगे, लहान मासे, कंद हे त्यांचे आवडते खाणे !

पावसाळा येताच लहान तळी, बोडीकाठचा मोहा, बेहडा, चिंच, किंवा पळसाच्या झाडावर अडई जोडीजोडीने बसलेले दिसतात. अशाच एखाद्या झाडाच्या पोखरीत मादी अंडी घालते. अंड्यावर बसलेल्या अडईचे चित्र घेण्याकरता आम्ही हिंडत होतो.

पालांदूर येथे साठ फूट उंचीवर ताडाच्या झाडाच्या फंटीत अडई घरटे करते. तळ्यावरून घरट्याकडे झेप घेणाऱ्या अडईसारखे मनाला भावणारे दृश्य निसर्गात क्वचितच असेल.

गाईगुरांबरोबर जंगलात हळूहळू फिरणाऱ्या दाम्या गायक्याचे साऱ्या परिसरात लक्ष असे. त्यानेच बातमी दिली, की भुईशिंदीच्या झुडुपातून एक अडई फडफड उडालेली त्याला दिसली. दुसऱ्या दिवशी कॅमेरे घेऊन आम्ही पवनीच्या जंगलातून खरकाडी नाल्याची वाट धरली. एखाद्या

३.५.२/४.५.१, ४.५.३, ५.५.१, ५.५.२, ६.५.१, ९.५.१


फेंटी
बेहडा
मोहा
मोहाची पाने
मुईशिंदी
अडइचे घरटे

गुप्तधनाकडे जावे तसे आम्ही उत्सुकतेने व उत्साहित मनाने हिरव्यागार गवतातील शेवाळलेल्या पाऊलवाटेने चाललो होतो. अडईचा गोदा शंभर-दीडशे फुटांवर असल्याचे दामाने सांगितले. आम्ही हळूहळू पावलं टाकत भुईशिंदीच्या झुडपानजीक आलो. दामा बोटाने खुणावत त्यात अडई बसल्याचं सांगत होता. मी चोरपावलाने झुडुपानजीक आलो.

आम्ही तिच्या घरट्याचे निरीक्षण केले. झुडपाच्या मध्यावर तिने गवत, पाने जमिनीवर अंथरून गोलाकार घरटे केले होते. त्यात फिक्या पिवळसर रंगाची दहा अंडी दिसली. भुईशिंदीच्या झुडपाला नाल्याच्या बाजूने गोल छिद्राचे प्रवेशद्वार होते. दाराला लागून दीड फूट लांबीचे भुयार झुडपात होते. हे भुयार मोठे अद्भुत होते. वरच्या पानांची कमान केली होती. बाजूची पाने एकमेकांत मोठ्या कुशलतेने गुंफली होती. त्या झुडपाजवळून जाणाऱ्या येणाऱ्यांना इथे गोदा असावा असे कधीच वाटले नसते.

आम्ही त्या घरट्यापासून शंभर फूट अंतरावर एका आवळ्याच्या झाडाआड लपून बसलो. अंदाजे दहा-पंधरा मिनिटांनी अडई नाल्यातून हळूहळू चालत वर येताना दिसली. मोठ्या सावधगिरीनं ती घरट्याकडे येत होती. मध्येच ती खोलगट भागात थांबून एखादया गनिमाप्रमाणे टेहळणी करी. घरट्याच्या दाराजवळ येऊन ती दोन मिनिटे थांबली. तिने इकडेतिकडे पाहिले. लगेच ती घरट्यात जाऊन बसली. मोठे अद्भुतरम्य होते ते दृश्य !

दुसऱ्या दिवशी आम्ही पुन्हा आलो. एकाएकी उंच आकाशात घरट्याच्या वरच्या बाजूने अडई फडफड उडाली. क्षणातच अडईची जोडी उडताना दिसली. आम्ही हळूहळू घरट्याजवळ पोचलो, तर भीतीने अंगावर काटाच उभा राहिला. सहा फूट लांबीचा हिरवट पिवळा साप आपल्या जिभेने अंड्यांना स्पर्श करत होता. मला वाटले काळ्या

फुलण्याआधीच कुस्करल्या जाणार ! आम्ही मोठ्या प्रयत्नाने त्या सापाला घरट्याबाहेर हुसकावून लावले. लांबपर्यंत त्याला हाकलून लावले. अंडी बचावली.

अंड्यांतील जीवांचा क्षीण आवाज कानी येत होता. अंड्यांच्या रुंद भागातून पिलांची चिमुकल्या चोची बाहेर काढण्याची धडपड सुरू झाली होती. चिव चिव करत त्यांनी कवचाला भोके पाडली, त्यातून हवा आत गेली. शरीर व पंखांचे प्रसरण होताच कवचे उकलून बाजूला पडली. गोजिरवाणी इवलीशी पिले एकामागून एक बाहेर आली. बराच वेळ झाला, तरी मादी घरट्याकडे परतली नाही. कुठे साप तर तिला चावला नाही ना ? ती आली नाही तर पिलांचे काय होईल, या विचारांनी आम्ही सचिंत झालो. सायंकाळपर्यंत तिथेच थांबलो. अडई परत आली आणि अलगद घरट्यात बसली. आम्हांला खूप आनंद झाला. दिवेलागणीला गावात आलो.

ती अडई, घरट्यातील पिलांची चिवचिव, तो दुष्ट साप, मोहाच्या झाडावरून घरट्याभोवती 'सिक् सिक्' करत घिरट्या घालून रक्षण करणारा नर, दहा सुंदर पिले, यांचीच स्वप्ने रात्रभर पाहता पाहता कोंबडा आरवला. आम्ही उठलो. दुर्बीण, कॅमेरा घेऊन परत जंगलाचा रस्ता धरला.

जंगलातील ती हिरवी शांतता अतिरम्य होती. मोहाच्या झाडावरून नराची शीळ ऐकू आली. दुर्बिणीतून घरट्यात पाहिलं, तर सहा पिलं अडई मादीच्या अंगाभोवती व चार तिच्या पंखात दडून बसली होती. काळ्या-पांढऱ्या रंगांची, चिमुकल्या पंखांवर पांढरे ठिपके असलेली ती गोजिरवाणी पिले पाहून फार आनंद झाला. आम्ही अडई व तिच्या पिलांची पटापट छायाचित्रे घेतली.

अडईने घरटे सोडले आणि थोड्या अंतरावर जाऊन 'चिक्ऽऽ' असा आवाज केला. ती पिलं हारीने तिच्या मागोमाग जाताना दिसली. सृष्टीच्या वन्य दृश्यांपैकी ते एक अतिसुंदर दृश्य होते.

आई आणि तिच्या पिलांचा मागोवा घेत आम्ही चाललो होतो. ती नाल्याकडे गेली. पावसामुळं ओढ्याला पाणी आले होते आणि खळखळाट करून तो वाहत होता. खाली डोह होता. त्या डोहात आपली पिले घेऊन ती कशी जाते ते आम्हांला पहायचे होते. तिने दोन झुडपांच्या कमानीतून प्रवेश केला आणि बाजूच्या खडकाच्या आधाराने हळूहळू डोहात उतरली आणि गहिऱ्या पाण्यात अडई आणि तिची पिले सहजपणे आपोआप तरंगू लागली. जलविहार करू लागली. डोहाच्या दोन्ही बाजूंच्या बट्टी चढायला अवघड होत्या. तशी ती प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने तरंगत दुसऱ्या वळणावर आली. इथे किनारा सपाट होता. पिलांनी तिचे अनुकरण केले आणि पाण्याबाहेर आली.

मध्येच ती भुईशिंदी, बोरी व घोटीच्या काटेरी झुडपांत दडून बसत. पिले तिच्या पंखाखाली दिसेनाशी होत. वरून अडई नर 'चीवई चिव', 'चिवई चिव' करत घिरट्या घालताना दिसे. ठरावीक गवताचे बी चोचीने ती पिलांना दाखवी फक्त. त्यावर पिले तुटून पडत. 'आज्ञापालन म्हणजे जीवन' हे त्यांनी जन्मापासून अवगत केले होते.

अडईच्या इवल्याशा गोजिरवाण्या पिलांकडे आम्ही डोळे भरून पाहत होतो. एका प्राणांतिक संकटातून आम्ही त्यांना वाचवले होते ! त्यांचा पुढचा प्रवास या जंगलात शेवटास जाईल, की पुन्हा संकटे येतील ? दृष्टीपुढून ती पिले दूर जंगलात दिसेनाशी झाली. एक विलक्षण सुंदर अनुभव घेऊन आम्ही परतलो.

---

(९.५.१)

**देवधान** - साळीचा एक प्रकार, तळ्याकाठी नैसर्गिकपणे खूप प्रमाणात वाढते.

**बोडी** - शेताजवळचे लहान तळे, डबके

**मोहा** - जंगलातील एक डेरेदार झाड; वन्य प्राणी व पक्षी मोहाची फुले आवडीने खातात.

**बेहडा** - औषधी वनस्पती
**पोखर** - झाडाची ढोली (अडई त्यात अंडी घालते.)
**फंटी** - ताडाचे खोड आणि फांदी यांतील जागा
**गायक्या** - गाई राखणारा
**भुईशिंदी** - शिंदीचे जमिनीलगत वाढणारे झुडूप
**गोदा** - घरटे
**गनिम** - शत्रू
**टेहळणी** - बारीक दृष्टीने पाहणी करणे, नजर ठेवणे
**हारीने** - ओळीने
**बट्टी** - ओढ्याची दरड
**घोटी** - एक काटेरी झुडूप

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) अडई पक्ष्याचे दुसरे नाव काय ?
(ब) अडई पक्षी जोडीजोडीने कोठे बसलेले दिसतात ?
(क) अडई पक्षीण घरटे कोठे करते ?
(ड) मनाला भावणारे कोणते दृश्य होते ?
(इ) पिलांची कोणती धडपड सुरू झाली होती ?
(फ) अडईंचे आवडते खाणे कोणते ?
(ग) पिल्लांनी कोणते तत्त्व जन्मापासून अवगत केले होते ?

२. **खालील प्रश्नांची सविस्तर उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
(अ) अडईच्या घरट्याचे वर्णन करा.
(ब) अडईच्या घरट्याजवळ पोचताच लेखकाच्या अंगावर काटा का उभा राहिला ?
(क) अंड्यातून बाहेर पडण्यासाठी अडईच्या पिलांनी कशी धडपड केली ?
(ड) अडई आपली पिले घेऊन डोहात कशी गेली ?
(इ) दुर्बिणीतून पाहिल्यावर लेखकाला घरट्यात कोणते दृश्य दिसले ?

३. **रिकाम्या जागी पाठातील योग्य शब्द भरा.** (५.५.१, ५.५.२)

(१) डोहाच्या दोन्ही बाजूंच्या .............. चढायला अवघड होत्या.

(२) .............. झुडपातून अडई फडफड उडालेली दिसली.

(३) अडईचा .............. शंभर-दीडशे फुटांवर असल्याचे दामाने सांगितले.

(४) अडई खोलगट भागात थांबून एखाद्या गनिमाप्रमाणे .............. करी.

(५) सृष्टीच्या वन्य दृश्यांपैकी ते .............. दृश्य होते.

४. **वाक्प्रचारांचा अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.** (८.५.१, ९.५.१)
वाट धरणे, टेहळणी करणे, चोरपावलाने येणे, अंगावर काटा उभा राहणे, हुसकावून लावणे, सचिंत होणे, मागोवा घेणे, मनाला भावणे.

## उपक्रम

- **तुम्हांला आवडणाऱ्या पक्ष्याचे वर्णन करा. (लिहा)** (४.५.३)
- **पक्ष्यांच्या चित्रांचा संग्रह करा.**
- **खाली दिलेल्या मुद्द्यांच्या आधारे तुम्हांस माहीत असणाऱ्या पक्ष्यांची माहिती लिहा.** (४.५.३)
पक्ष्याचे नाव, पक्ष्यांचे वर्णन, पक्ष्याचा आवाज, पक्ष्याचा आहार व त्याच्या घरट्याचे वर्णन आणि त्याच्या पिलाची माहिती.

**व्याकरण :** (६.५.१)

■ **क्रियाविशेषणे**

खालील वाक्ये वाचा.

(१) आई मुंबईस गेली.

(२) आई काल मुंबईस गेली.

काय फरक आहे या दोन वाक्यांत ? दुसऱ्यात 'काल' हा शब्द अधिक आला आहे. यांतील पहिल्या वाक्याचा अर्थ पुरा आहे खरा,

पण दुसऱ्या वाक्यातील 'काल' या शब्दाने आई मुंबईस केव्हा गेली हे सांगितले आहे. 'काल' या शब्दाने 'गेली' या क्रियापदाबद्दल विशेष माहिति सांगितली आहे. हे क्रियापदाचे विशेषण आहे.

खालील वाक्ये वाचा.

(१) तो मुलगा चालतो.

(२) तो मुलगा सावकाश चालतो.

यांतील पहिल्या वाक्यापेक्षा दुसऱ्या वाक्यात 'सावकाश' हा शब्द अधिक आला आहे. मुलगा कसा चालतो ? सावकाश. 'सावकाश' या शब्दाने 'चालतो' या क्रियापदाबद्दल विशेष माहिती दिली. हेही क्रियापदाचे विशेषण आहे.

खालील वाक्ये पाहा.

(१) उद्या शाळेस सुटी आहे.

(२) येथे कपडे धुऊन मिळतील.

(३) तो हळूहळू चालू लागला.

(४) गुरुजींनी त्याला दोनदा बजावले.

वरील वाक्यांतील 'उद्या, येथे, हळूहळू, दोनदा' हे शब्द त्या त्या वाक्यांतील क्रियापदांबद्दल विशेष माहिति सांगतात. क्रियापदांबद्दल केव्हा, कोठे, कसा, किती अशा प्रकारची विशेष माहिती सांगणारे शब्द वाक्यांत येतात.

**क्रियापदाबद्दल विशेष माहिति सांगणाऱ्या शब्दांना 'क्रियाविशेषण' असे म्हणतात.**

## अभ्यास

**(१) खालील वाक्यांतील क्रियाविशेषणे ओळखा.**

(अ) एकदा राजाला स्वप्न पडले.

(आ) नदीचा प्रवाह संथ वाहतो.

(इ) जिकडे तिकडे घनदाट झाडी आहे.

(ई) लहान मुले त्यांच्याकडे टकमका पाहतात.

(उ) संध्याकाळी पाऊस खूप पडला.

**(२) मोकळ्या जागी क्रियाविशेषणे घालून पुढील वाक्ये पूर्ण करा.**

(अ) काळे ढग पाहून मोर .................. नाचतो.

(आ) आमच्या घराच्या .................. काळे रान आहे.

(इ) शिकारीस गेल्यावर .................. सावध असावे लागते.

(ई) बिचारा ससा .................. पळत होता.

(उ) पाण्याचा ओहळ .................. वाहत होता.



# १९. संतवाणी

(चंदनाला इतर वनस्पतींना हाक देऊन 'माझ्या अंगी सुवास आहे' असे जाहीर करावे लागत नाही. जे अंतरंगात आहे ते नैसर्गिकपणे बाहेर धावणारच. अडवल्याने थोडेच अडणार आहे ? सूर्य स्वतः लोकांना जागे करत नाही किंवा तसे करायला आपल्या किरणांनाही सांगत नाही. मेघाला पाहून मोर आपोआप नाचू लागतो. सद्‌गुण किंवा आंतरिक ओढ लपवता येत नाही किंवा त्याचा प्रचारही करावा लागत नाही.)



न लगे चंदना सांगावा परिमळ ।
वनस्पतिमेळ हाकारूनी ॥ धृ ॥

अंतरीचें धांवे स्वभावें बाहेरी ।
धरितां ही परी आवरे ना ॥ १ ॥

सूर्य नाहीं जागें करीत या जना ।
प्रकाशकिरणा कर म्हूण ॥ २ ॥

तुका म्हणे मेघ नाचवी मयुरें ।
लपविता खरे येत नाही ॥ ३ ॥

**संत तुकाराम**



(आपल्या पिलांसाठी खाद्य आणावे म्हणून पक्षी दाही दिशांना फिरतात. घार आकाशात हिंडत असते, परंतु पुन्हा पुन्हा झेप घेऊन ती आपल्या पिलापाशी येते. आई कामात गुंतली असली, तरी तिच्या मनात आपल्या बाळाचेच विचार येत असतात. तिच्या मनाला त्याचीच काळजी लागून राहिलेली असते. वानरी या झाडावरून त्या झाडावर उड्या मारत असताना पोटाला बिलगलेल्या पिलाला दुखापत होऊ नये, म्हणून योग्य ती काळजी ती सहजच घेत असते. आपल्या बाळावरच्या आईच्या प्रेमाची ही उदाहरणे देऊन संत जनाबाई म्हणतात, की आमची विठ्ठलमाय आम्हांला अशीच सतत सांभाळत असते.)

३.५.२/५.५.१, ५.५.२, ७.५.१, ९.५.१





पक्षी जाय दिगंतरा । बाळकाशी आणी चारा ॥ १ ॥
घार हिंडते आकाशी । झाप घाली पिल्लापाशी ॥ २ ॥
माता गुंतली कामासी । चित्त तिचे बाळापाशी ॥ ३ ॥
वानर हिंडे झाडावरी । पिली बांधुनिया उदरी ॥ ४ ॥
तैसी आम्हांसी विठ्ठलमाये । जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

**संत जनाबाई**



(देव मोठा सर्वशक्तिमान आहे असेही लोक एकीकडे म्हणतात आणि देव म्हणून दगडधोंड्यांची पूजाही करतात.

दुःख, दारिद्र्य, रोगराई यांचे कष्ट आपल्याला का भोगावे लागतात याची जाणीव न ठेवता, त्यावर खरे, योग्य उपाय न करता, लोक ते कष्ट भोगत राहतात. ते दुःख दूर करण्यासाठी दगडालाच भक्तिभावाने फुले वाहण्यास सांगतात. गरीब बिचाऱ्या मुक्या प्राण्यांचा बळी घेऊन या दगडाच्या देवाला नैवेद्य दाखवतात. दुःख निवारण्यासाठी त्या दगडाच्या देवापुढे नाक घासून गयावया करतात किंवा आपल्यावर आलेल्या संकटांबद्दल देवाला दोषी ठरवतात. लोकांच्या अशा मूर्खपणाबद्दल, अडाणीपणाबद्दल आणि अंधश्रद्धेबद्दल संत एकनाथांनी लोकांना या अभंगाद्वारे जागे केले आहे.)



म्हणती देव मोठे मोठे । पूजिताती दगड गोटे ॥
कष्ट नेणती भोगिती । वहा दगडाते म्हणती ॥
जीत जीवा करूनी वध । दगडा दाविती नैवेद्य ॥
नाक घासुनी गव्हार । देवा म्हणती गुन्हेगार ॥
एका जनार्दनी म्हणे । जन भुलले मूर्खपणे ॥

**संत एकनाथ**

(९.५.१)

**दिगंतर** - दाही दिशा, दूर अंतर
**झाप** - झेप
**जीत** - जिवंत
**नेणती** - न जाणती
**गव्हार** - अडाणी

## स्वाध्याय

१. **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)
   (अ) चंदन वृक्षाचा कोणता गुण आहे ?
   (ब) मोर केव्हा नाचायला लागतात ?
   (क) आपल्या पिलांसाठी चारा आणायला पक्षी कोठे जात असतात ?
   (ड) घार आकाशात फिरत असताना ती कोणाकडे झेप घेत असते ?
   (इ) आई घरात काम करत असताना तिचे मन कोठे गुंतलेले असते ?

२. **खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(अ) सद्गुण किंवा आंतरिक ओढ याचा प्रचार करावा लागत नाही, हे पटवून देण्यासाठी संत तुकारामांनी कोणकोणते दाखले दिले आहेत ?

(ब) विठ्ठल आणि आई यांच्यातील साम्य दाखवताना जनाबाईने कोणकोणती उदाहरणे दिलेली आहेत ?

(क) संत एकनाथ लोकांना मूर्ख का म्हणतात ?

३. **असे का घडते ते सांगा.** (५.५.१)

(अ) काही लोक देवाला गुन्हेगार ठरवतात.

(ब) लोक दगडधोंड्याची पूजा करतात.

(क) आकाशात फिरणारी घार अधूनमधून आपल्या पिलांपाशी झेपावते.

(ड) ढग मोराला नाच म्हणून सांगत नाही, तरी आकाशात ढग आले की मोर नाचू लागतो.

४. **कोण ते सांगा.** (५.५.२)

(अ) देवाबद्दलचे लोकांचे अज्ञान पटवून देणारे.

(ब) पिलाला पोटाशी घेऊन झाडावर उड्या मारणारी.

(क) माझ्याजवळ सुवास आहे, हे स्वतःहून न सांगणारा वृक्ष.

(ड) विठ्ठल आणि आई यांच्यात साम्य दाखवणारी संत.

५. **योग्य त्या जोड्या जुळवा.** (५.५.१)

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) मूर्ख लोक | (अ) लपवता येत नाही |
| (ब) उगवता सूर्य | (ब) सुगंध |
| (क) आंतरिक ओढ | (क) दगडाची पूजा करतात |
| (ड) विठ्ठल | (ड) लोकांना आपणहून जागे करत नाही |
| | (इ) पिलू पोटाशी बांधते |
| | (फ) आईप्रमाणे सांभाळ करतो |

६. **खालील ओळींचा अर्थ सांगा.** (५.५.१)

(अ) अंतरीचें धांवे स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरेना ॥

(ब) माता गुंतली कामासी । चित्त तिचे बाळापाशी ॥

(क) नाक घासुनी गव्हार । देवा म्हणती गुन्हेगार ॥

**७. खालील शब्दांचे अभंगात असलेले अर्थ दिले आहेत, पण त्या शब्दांचे दुसरेही अर्थ होतात, ते कोणते सांगा.** (९.५.१)

(१) कर - (अ) करणे क्रियापदाचे आज्ञार्थी रूप (ब)

(२) परी - (अ) परंतु (ब)

(३) किरण - (अ) प्रकाशाचा स्रोत (ब)

**८. समानार्थी शब्द सांगून खालील शब्दांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१, ९.५.१)

दगड, देव, पक्षी, मेघ.

**९. या अभंगात 'दगडगोटे' असा एक शब्द आला आहे. असे जोडून येणारे पाच शब्द सांगा.** (९.५.१)

**१०. खालील चौकटीतील अक्षरांचा उपयोग करून खालील अर्थाचे शब्द तयार करा.** (९.५.१)

(अ) एका वृक्षाचे नाव

(ब) ढगाचे समानार्थी दोन शब्द

(क) पोट या शब्दाचा समानार्थी शब्द

(ड) एका संताचे नाव

| | | | |
|---|---|---|---|
| न | क | द | मे |
| घ | थ | चं | ए |
| द | र | ना | उ |

**११. सुगंध, लोक, ढग, मोर, पोट या अर्थाचे कोणते शब्द संतवाणीत आले आहेत, ते शोधा व सांगा.** (९.५.१)



'विचारधन'मधील उतारे पूरक वाचनासाठी आहेत. यावर परीक्षेत प्रश्न विचारणे अपेक्षित नाही.

# २०. विचारधन

## संत रोहिदासांची शिकवण



सगळे लोक जातीपातीच्या फेऱ्यात सापडलेले आहेत. जातिभेदाचा हा रोग मानवतेलाच खातो आहे. जन्माच्या आधारावर कोणाचीही जात मानण्याचा सिद्धान्त आपण सोडला पाहिजे. कोणीसुद्धा मनुष्य जन्मापासून ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र होत नसतो. उच्च कर्मापासून उच्च, नीच कर्मापासून मनुष्य नीच होतो. वास्तविक सर्व मनुष्ये एकसमान आहेत. त्यांच्यामध्ये जन्मतः काही अंतर नसते.

कुकर्मी मनुष्य अशुद्ध-अपवित्र म्हणजेच नीच असतो. जो मनुष्यमात्राच्या सेवेत राहतो, जो कधी असत्य बोलत नाही, त्याचे जीवन प्रशंसनीय असते. सत्य, संतोष आणि सदाचार हे जीवनाचे मूलाधार आहेत. याचे पालन करणारे सदैव वंदनीय ठरतात.

**– मा. आ. कारंडे** यांच्या
**संत रोहिदास : चरित्र आणि वाङ्मय**
या ग्रंथातून



# छत्रपती शिवाजी महाराजांचे आज्ञापत्र

॥ श्री ॥

"आरमार तख्ते, सोट, डोलाच्या काठ्या आदीकरून थोट लाकूड असावे लागते. ते आपल्या राज्यामध्ये अरण्यामध्ये सागवानादी वृक्ष आहेत त्याचे जे अनुकूल पडेल ते हुजूर लेहून हुजूराचे परवानगीने तोडून न्यावे. याविरहीत जे लागेल ते परमुलकीहून खरेदी करून आणवीत जावे. स्वराज्यातील आंबे, फणस आदि करून हेही लाकडे आरमाराचे प्रयोजनाची. परंतु त्यास हात लाऊ न दयावा. काय म्हणोन की ही झाडे वर्षा दो वर्षानी होतात यैसे नाही. रयतेने ही झाडे लाऊन लेकरांसारखी बहुतकाळ जतन करून वाढविली ती झाडे तोडिलियावरी त्याचे दुःखास पारावार काये ? येकास दुःख देऊन जे कार्य करीन म्हणेल ते कार्य करणारासहित स्वल्पकालेच बुडोन नाहिसेच होते. किंबहुना धन्याचेच पदरी प्रजापीडणाचा दोष पडतो. या वृक्षाच्या आभावे हानीही होते. याकरिता हे गोष्ट सर्वथा होऊ न दयावी, कदाचित येखादे झाड जे बहुत जीर्ण होऊन कामातून गेले असेल तरी त्याचे धन्यास राजी करून द्रव्य देऊन त्याच्या संतोषे न्यावे. बलात्कार सर्वथा न करावा."

(**बलात्कार सर्वथा न करावा -** कोणत्याही परिस्थितीत जुलूमजबरदस्ती करू नये.)

# विचारांचा महिमा



भारतीय संस्कृतीत अंधश्रद्धेला स्थान नाही. विचाराचा महिमा सर्वत्र गायलेला दिसतो. भारतीय संस्कृतीचा वेद हा पाया मानला जातो; परंतु वेद म्हणजे काय ? वेद या शब्दाचा अर्थ 'ज्ञान' असा आहे. ज्ञान हा भारतीय संस्कृतीचा आधार आहे. ज्ञानावर उभारलेली ही भव्य संस्कृती आहे.

जीवनाला सुंदर करणारा प्रत्येक विचार म्हणजे वेद आहे. आपले आयुष्य आनंदी व उत्साही कसे राहील, हे आयुर्वेद सांगेल. समाजाचे रक्षण कसे करावे, ते धनुर्वेद सांगेल. समाजाची करमणूक कशी करावी, समाजाला दुःखाचा विसर कसा पडावा, ते गांधर्ववेद सांगेल. हे सारे वेदच आहेत.

विचार नवजीवन देतो. आज निर्मळ विचार व शुद्ध दृष्टी यांची नितांत आवश्यकता आहे. येथे अधीरता नको, उतावीळपणा नको; स्वार्थ नको, आळस नको. निर्मळता हवी असेल, तर खोल अभ्यासाची आवश्यकता आहे. प्रयत्न व कष्ट यांची जरूरी आहे. समाजाबद्दल प्रेम व कळकळ यांची जरूरी आहे. समाजाला सुखी कसे करता येईल, ही तळमळ लागली म्हणजे मग तुम्ही विचार करू लागाल. मग जो विचार स्फुरेल, त्याचा आचार सुरू होईल. हाच विचारांचा महिमा आहे.

**– साने गुरुजी**

# २१. चिंटूचे विनोद

बालमित्रांनो, चिंटू हा तुमच्याच वयाचा मुलगा; पण त्याचे बोलणे, चालणे थोडे इतरांहून वेगळे असल्याने त्यातून विनोद घडतो. वाचून पाहा. तुम्हालाही चिंटूचे विनोद आवडतील.

– चारुहास पंडित/प्रभाकर वाडेकर



















निघतो आता. आईला फराळाच्या पदार्थांसाठी मदत करायचीय.
तू मदत करतोस? कित्ती छाऽन!


करायलाच पाहिजे. नाहीतर मग मला...


आईनं कुठल्या डब्यात काय ठेवलंय ते कळत नाही.


सतीशदादा, आपण बुद्धिबळ खेळायचं?
चल, चिंटू. तुला लगेच हरवतो.


मी जिंकलो! मी जिंकलो!!
मी मुद्दामच तुला जिंकू दिलं.


मी पण तुला मुद्दामच हरवलं!


अहो पोस्टमनकाका, आमचं पत्र आहे का?
बघतो हं... काय नाव तुमचं?


ते त्या पत्रावर लिहिलं असेलच की!



# २२. चित्रांची भाषा



[ **रवी परांजपे** यांनी स्वतः काढलेल्या चित्राचे स्वतःच केलेले हे रसग्रहण आहे. मुखपृष्ठावरील चित्राबद्दल चित्रकार स्वतःच बोलत असल्यामुळे ते अधिक परिणामकारक झाले आहे. चित्रातील प्रतिके, चित्रमांडणी, रेखांकन, रंगसंगती इत्यादी बारकाव्यांची माहिती वाचून मुलांमध्ये चित्रकारांकडे आवश्यक असणारी दृष्टी आणि गुण विकसित होण्यास निश्चितच मदत होऊ शकेल. ]

बालमित्रांनो ! या पुस्तकाच्या मुखपृष्ठावरचं माझं चित्र तुम्हांला आवडलं का ? का तुमचं त्याकडे अजून पुरेसं लक्ष जाऊ शकलेलं नाही ! नसेल तर पुन्हा एकदा ते पाहा कारण ते मी खास तुमच्यासाठी केलं आहे.

या चित्रात तुमच्याच वयाची दोन आनंदी मुलं आहेत. त्यांच्या हातांत ज्ञानाचं प्रतीक ठरणारी पुस्तकं दिसत आहेत. मुलांच्या आजूबाजूला दिसत आहेत फुलं. ही फुलं जणु मुलांच्या ज्ञानाच्या आनंदात भरच घालत आहेत. मुलांच्या शेजारीच दिसतोय एक पृथ्वीचा गोल-तुमचं आणि जगाचं नातं सांगणारा. त्याच्या बाजूला दिसतोय एक जुन्या पद्धतीचा दिवा. एकेकाळी या दिव्याचं अभ्यास करणाऱ्या मुलांशी एक अतूट नातंच जणू जुळलेलं होतं. म्हणूनच हा दिवा मला ज्ञानाचा प्रकाश पसरवणारा दिवा वाटला. या दिव्याच्या आजूबाजूला दिसताहेत कुंभारानं घडवलेली मातीची बोळकी. ही साधी बोळकी आपल्याला भान मात्र देतात ते कुंभाराच्या तंत्राचं, कौशल्याचं आणि अपार कष्ट करण्याच्या त्याच्या क्षमतेचं !

चित्रात आपल्याला नंतर दिसतंय गतिमान जीवनाचं प्रतीक असलेलं, विजेवर चालणारं रेल्वे इंजिन. ते तुम्हांला सांगू पाहतंय की 'गतिमान व्हा'. शेजारीच एक काकाकुवा पोपटपण दिसतोय. जंगलातल्या

पशुपक्ष्यांची आठवण करून देणारा हा बहुरंगी पक्षी आपल्याला वन्यप्राणी रक्षणासाठी, वनरक्षणासाठी जणू सादच घालतोय. वनरक्षण, पर्यावरण रक्षण आणि जलरक्षण अशा सर्व गोष्टी अंतिमतः मानवी हिताच्याच नाहीत का ? पण या सर्व गोष्टी आज धोक्यात आल्या आहेत. अशावेळी त्यांबाबतचा अभ्यासही महत्त्वाचा झाला आहे. या अभ्यासाचा एक भाग अंतरिक्षातील उपग्रहामार्फतच होत असतो आणि म्हणूनच माझ्या चित्रात उपग्रहाला अंतरिक्षात घेऊन जाणारा अग्निबाणपण दाखवला आहे.

अग्निबाणाचं अंतरिक्षातील प्रक्षेपण आणि अंतराळ संशोधन या आपल्या देशाच्या तंत्रज्ञान विकासाच्या भावी दिशा आहेत. या दोन्ही दिशांनी होणाऱ्या प्रवासात संगणकाचं महत्त्व अनन्यसाधारण असल्यामुळं माझ्या चित्रात संगणकही दिसतोय. त्याच्या पाठीमागंच दिसतोय आपल्या इतिहासाची आठवण देणारा किल्ला. आणि अंतरिक्षात झेप घेताना भूतलावरील डोंगरमाथे, जलमार्ग, निसर्ग आणि निसर्गाशी जुळवून घेत जगणारे आपले आदिवासी बांधव यांना विसरता कसं येईल ? असा प्रश्नच जणू माझ्या चित्रातील निळे डोंगर, शिडांच्या बोटी, गलबत, तांबूस, केशरी व गुलाबी असे पालवीचे रंग दाखवणारे डेरेदार झाड आणि शेजारच्या आदिवासींच्या झोपड्या आपल्याला विचारत आहेत.

बालमित्रांनो, या साऱ्याचा अर्थ इतकाच, की तुमच्या शालेय शिक्षणाला, पुस्तकी विद्येखेरीज अन्य काही सामाजिक, सांस्कृतिक संदर्भ आहेत. या संदर्भांचा तुमच्या शालेय शिक्षणाशी जितका चांगला मेळ बसेल, तितका चांगला नागरिक तुमच्यातून निर्माण होईल ! हे मला थोडं जोर देऊन सांगावसं वाटतं.

हे सारं सांगणारं आणि वरील संदर्भाचा खेळ आणि मेळ दाखवणारं हे एक प्रतीकात्मक चित्र आहे. आणि म्हणूनच या चित्रात प्रतीकांचा खेळ

आणि मेळ दाखवणारी एक गुंफणच मी चितारली असल्याचं तुम्हांला जाणवेल. ही गुंफण साकारताना चित्रातील विविध प्रतीकांचे आकार एकमेकांशी धक्काबुक्की न करता एकमेकांना सामावून घेत आहेत हे तुम्हांला स्पष्ट व्हावं अशी काळजी मी घेतली आहे. अशी काळजी तुम्ही तुमच्या सवंगड्यांशी किंवा देशबांधवांशी मित्रत्वाचे किंवा स्नेहाचे संबंध निर्माण करून घ्यावयास नको का ? रेषांचे, आकारांचे, रंगांचे, चित्रातील मोकळ्या जागांचे आणि पोतांचे परस्पर स्नेहसंबंध ज्यावेळी चित्रात निर्माण होतात किंवा जाणीवपूर्वक निर्माण केले जातात, त्याचवेळी चित्राची आदर्श मांडणीपण साकारत असते आणि ही चित्रमांडणीच चित्रामध्ये आनंद देण्याची क्षमता उत्पन्न करत असते.

ही चित्रमांडणी आपल्याला जीवनातील स्नेह, शिस्त, नियोजन आणि प्रमाण यांची शिकवण देते. या मानवी हिताच्या गोष्टी आम्ही अशा चित्रांमधून वेचावयास शिकलो तर ! आपल्या अवतीभवती खूप आनंदाचं वातावरण तयार होऊ शकेल.

आनंद निर्माण करणाऱ्या चित्रमांडणीला उत्तम रेखांकनाची साथही मिळू शकत असेल, तर चित्रातून मिळणारा आनंद द्विगुणित होत असतो, म्हणून अनेक चित्रकारांची चित्रनिर्मितीची पद्धत ही रेखांकनात्मक म्हणजेच रेषांवर भर देणारी असल्याचं तुम्हांला आढळून येईल. त्यामुळे माझी शैलीपण रेखांकनात्मक बनली आहे.

आदर्श मांडणी आणि आदर्श रेखांकनात्मक शैली यांच्या जोडीला माझ्या चित्रात दिसणारा तिसरा घटक आहे रंगसंगतीचा. याही चित्रात माझ्या प्रस्तुतच्या चित्रात मी रंगसंगतीचीही गुंफण साधण्याचा प्रयत्न केला आहे. ही गुंफण साधण्यासाठी मी प्रथम चित्राच्या मध्यभागी दिसणाऱ्या पांढऱ्या जागेभोवती उजळ पिवळ्या रंगाची योजना केली आहे. अशा

रीतीनं पांढरा व पिवळ्या रंगांचं स्थान निश्चित झाल्यानंतर चित्रातील तपशिलावरून इतर रंग, एखादद्या वादद्यवृंदातील कलाकारांप्रमाणे आपापल्या ठरवून दिलेल्या जागी जाऊन बसले.

तेव्हा, बालमित्रांनो ! चित्रातले हे बारकावे तुम्हांला आता समजले ना ? मग आता हे बारकावे उमजणाऱ्या नजरेनं माझ्या चित्राकडे पुन्हा पाहा आणि मगच तुम्हांला माझं चित्र आवडलं अथवा नाही हे ठरवा ! पण बालमित्रांनो, चित्रातील असे बारकावे टिपण्याची सवय नंतर सोडायची नाही बरं का ! ही सवय अशीच वाढवायची; त्यामुळे चित्रं पाहण्याची, चित्राचा आनंद व आस्वाद घेण्याची तुमची नजर पक्की होईल. ही नजर पक्की झाली, की एकतर तुम्ही चांगले चित्रकार बनू शकाल किंवा चांगले रसिक.



## स्वाध्याय



१. **खालील प्रतिकांवरून चित्रकारांना कोणत्या गोष्टी सुचवायच्या आहेत ?** (५.५.१, ५.५.२)

पुस्तक, पृथ्वीचा गोल, दिवा, मातीची बोळकी, इंजिन, किल्ला इत्यादी.

२. **चित्रातील खालील पैलूंवरून कोणकोणत्या गोष्टी साध्य होतात, असे लेखकांनी सांगितले आहे.** (५.५.१, ५.५.२)

मांडणी, उत्तम रेखांकन, रंगसंगती.

३. **काकाकुवाचे प्रतीक वापरून पर्यावरणासंबंधी कोणती माहिती चित्रकारांनी सांगितली आहे ?** (५.५.१, ५.५.२)

## उपक्रम

- इयत्ता ३ री व ४ थीच्या गणित, सामान्य विज्ञान व बालभारती मराठी या पाठ्यपुस्तकांची मुखपृष्ठे पाहा. चित्रातील बारकावे समजून घ्या आणि कोणत्याही एका मुखपृष्ठाबद्दलची माहिती १० ते १५ ओळींत लिहा. (४.५.३)

- चित्र काढण्यासाठी एक विषय निवडा. त्यावर तुमच्या कल्पनेने चित्र काढा. चित्रातील बारकावे १० ते १५ ओळींत लिहून दाखवा. (४.५.३)



# नमुना चाचणी प्रश्न

इयत्ता तिसरी आणि चौथीप्रमाणेच इयत्ता पाचवीच्या पाठ्यपुस्तकात शेवटी सबंध पाठ्यपुस्तकातील आशयावर आधारित नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. वार्षिक नियोजनानुसार मूल्यमापनासाठी घेण्यात येणाऱ्या चाचण्या तयार करण्यासाठी या नमुना प्रश्नांची शिक्षकांनी मदत घ्यावी. याच धर्तीवर अन्य व जादा प्रश्न तयार करावेत.

- **एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.५.१, ५.५.२)

(१) राजा बुद्धिसेनने बोलावणे पाठवूनही अभिजित दरबारात का गेला नाही ?

(२) कीर्तीचा जीव का तळमळला ?

(३) अहिल्याबाईंच्या कोणत्या प्रश्नाने कमावीसदारांचा गोंधळ उडाला ?

(४) निर्भय होण्यासाठी काय करावे, असे जोतिबा सांगतात ?

(५) प्रवाहाविरुद्ध पोहणे कठीण असले तरी ते आवश्यक आहे, असे किरण बेदी यांना का वाटते ?

(६) आजचे विचारवंत कोणत्या गोष्टीमुळे व्यथित झाले आहेत ?

(७) रेखा अनुला घरी का आणत नाही ?

(८) नंदीवाल्यांची पाले दरवर्षी गावाजवळच्या रानातच का पडत असत ?

(९) 'खरं म्हणजे रात्रीच मला तुझ्याकडून हवं ते उत्तर मिळालं' असे डॉ. मालपे भाऊंना का म्हणाले ?

(१०) प्रफुल्लचंद्र राय यांना लहानपणापासून कोणता छंद जडला होता ?

- **तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.५.२)

(१) 'पाऊस' या कवितेत आलेले वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.

(२) न्यायदानाच्या बाबतीत अहिल्याबाई कर्तव्यकठोर होत्या, हे कशावरून वाटते ?

(३) स्वातंत्र्यदिनाच्या समारंभाच्या पूर्वतयारीसाठी विद्यार्थ्यांनी शाळेत कोणकोणती कामे केली ?

(४) 'बाप' या कवितेतील शेतकऱ्याची परिस्थिती खूप गरिबीची होती, हे आपल्याला कशावरून वाटते ?

(५) आईने रेखाला दैनंदिनी का आणून दिली ?

(६) केशवसुतांच्या मते विद्यार्थ्यांमध्ये कोणती रहस्ये लपलेली आहेत ?

(७) 'मुलाचे पाय पाळण्यात दिसतात' ही म्हण डॉ. पंजाबरावांच्या बाबतीत कशी खरी ठरते ?

(८) अडई पक्ष्याचे घरट्यात जाणे, ही घटना चितमपल्लींना अद्‌भुतरम्य का वाटली ?

- **का ते सांगा.** (५.५.२)

(१) अभिजित राजाच्या दरबारात स्वतःहून जाण्यास तयार झाला.

(२) इच्छा असूनही बाळाची आई देवळात जाऊ शकत नव्हती.

(३) धो धो पाऊस पडायला लागल्यावर कीर्ती अबोलपणे हवालदिल झाली.

(४) अहिल्याबाईंनी कमावीसदाराला त्याच्या अधिकारावरून बडतर्फ केले.

(५) सर्व देशभक्तांचे आपण स्मरण केले पाहिजे, असे मुख्याध्यापकांनी सांगितले.

(६) सर्वांचे पोट भरणाऱ्या शेतकऱ्याला अतिशय कष्ट करावे लागतात.

(७) पर्यावरणाच्या बाबतीत माणूस कृतघ्न झाला आहे.

(८) ओळख नसलेल्या सुमित्रासाठी रेखाच्या आईने शंभर रुपये दिले.

(९) भाऊने लोभ्याला आपल्या अंगातील सदरा दिला, त्याबद्दल भाऊंच्या आईंनी भाऊला शाबासकी दिली.

- **गाळलेल्या जागी योग्य शब्द भरा.** (५.५.१)

(१) 'म्हंजे खूप खूप पाणी झालं, की झाडं ............'

(२) आमच्या राज्याची ............ तुमच्यासारख्या थोर अधिकाऱ्यावरच अवलंबून असते.

(३) ५ नोव्हेंबर, १९७९ रोजी दिल्लीच्या राजपथावर एक भयचकित करणारे ............ घडले.

(४) शिरीषकुमारने इतक्या लहान वयात देशभक्तीपोटी आपले आयुष्य ............ टाकण्याचे दिव्य केले.

(५) आपण निसर्गचक्राचा एक ............ आहोत.

(६) ............ नसताना हा व्यवहार चोख पाळला जाई.

(७) लोभ्याच्या शरीराला बसणारे चटके जणू भाऊच्या मनाला ............ देत होते.

(८) ............ ती हिरवी शांतता अतिरम्य होती.

- **....तर काय झाले असते ! कल्पना करा आणि लिहा.** (५.५.१)

(१) राजाने अभिजितच्या वृत्तीमधला दोष शब्दांनी बोलून दाखवला नसता तर –
(२) राजा घरातून जाईपर्यंत अभिजित अजिबात बोलला नसता तर –
(३) कमावीसदाराच्या कृत्याकडे अहिल्याबाईंनी कानाडोळा केला असता तर –
(४) पर्यावरणाच्या बाबतीत माणूस कृतज्ञ राहिला असता तर –
(५) रेखाने रोजनिशी लिहिली नसती तर –
(६) रेखाने आईपेक्षा अनुपमावर जास्त विश्वास ठेवला असता तर –
(७) नंदीबैलाला बोलता येत असते तर –

- **कोण कोणास म्हणाले ते सांगा.** (५.५.१)

(१) "नको जाऊ तू पाण्यात."
(२) "धनधान्यसंपन्न, कुळाची कीर्ती वाढवणारा, शतायुषी हो."
(३) "प्रवाहाविरुद्ध पोहणे फार कठीण असते."
(४) "तुमच्या पिढीचं भवितव्य पाहून आमच्या पिढीतल्या विचारी माणसांच्या मनास यातना होत आहेत."
(५) "अग्नि असे हा तेजस्वी रे फार."
(६) "पिलेग, महामारी, तापसर असा काही घाला यील का ?"

(७) "बाळ, ते सारे राहू दे. आता ताबडतोब झोप तू. नाहीतर मला फार दुःख होईल."

- **खालील प्रत्येक प्रश्नाची काही पर्यायी उत्तरे दिलेली आहेत. त्यांतील योग्य उत्तरांची निवड करा.** (५.५.१)

**(१) राजाने बोलावणे पाठवूनही अभिजित दरबारात गेला नाही; कारण –**

(अ) त्याचा राजावर राग होता.
(ब) राजाचे काम त्याला नको होते.
(क) राजदरबारात जाण्याची त्याला भीती वाटत होती.

**(२) कीर्तीच्या मैत्रिणींनी कुंडीतल्या झाडाचं नाव विचारल्यावर, तिला त्याचे नाव पटकन सांगता आले नाही; कारण –**

(अ) त्या झाडाला अजून नाव द्यायचे होते.
(ब) कीर्तीला त्याचे नाव अजिबात माहीत नव्हते.
(क) कीर्तीला त्याचे नाव आवडत नव्हते.

**(३) रेखाची मैत्रीण अनुपमा श्रीमंत असूनही तिने आजारी सुमित्राच्या औषधासाठी मदत केली नाही; कारण –**

(अ) सुमित्राचे आजारपण खरे नव्हते.
(ब) सुमित्रावर तिचा राग होता.
(क) ती फार कंजूष होती.
(ड) कदाचित दुसऱ्याला मदत करणे तिला आवडत नसावे.

**(४) महाराष्ट्रातील कन्यांना महाराष्ट्राबद्दल खूप अभिमान आहे; कारण –**

(अ) मातृभूमी.
(ब) डोंगरदऱ्यांचा देश.
(क) अनेक नद्यांचा देश.
(ड) काही परंपरा चांगल्या आहेत.

- **खाली काही वाक्प्रचार आणि त्यांचे अर्थ दिले आहेत. त्यांच्या योग्य जोड्या जुळवा** (९.५.१)

| अ | ब |
|---|---|
| (१) स्तब्ध होणे | (१) नावलौकिक घालवणे |
| (२) नजर खिळून राहणे | (२) सगळीकडे काळा रंग देणे |
| (३) काळे फासणे | (३) सार्थकी लागणे |
| (४) चीज होणे | (४) खूप रागावणे |
| (५) भाळी लिहिणे | (५) काही न सुचल्यामुळे गप्प राहणे |
| | (६) नशिबी असणे |
| | (७) एकटक बराच वेळ पाहत राहणे |

- **खालील 'अ' आणि 'ब' गटांतील शब्दांचा वर्णमालेनुसार क्रम लावा आणि त्यांच्या विरुद्धार्थाच्या जोड्या लावा.** (७.५.१, ९.५.१)

**(अ)** सजीव, मुसळधार, अबोल, सेवक, एकत्र, पाप, शोषण, नैसर्गिक.

**(ब)** मालक, पोषण, निर्जीव, कृत्रिम, रिमझिम, पुण्य, बोलका, विस्कळीत.

- **खालील 'अ' आणि 'ब' गटांतील शब्दांचा वर्णमालेनुसार क्रम लावा आणि त्यांच्या समान अर्थाच्या जोड्या लावा.** (७.५.१, ९.५.१)

**(अ)** दास, देऊळ, मेघ, अपराध, पृथ्वी, जंगल, पक्षी, धनवान.

**(ब)** गुन्हा, विहंग, नोकर, श्रीमंत, मंदिर, ढग, वन, वसुंधरा.

- **खालील प्रत्येक शब्दाचे दोन अर्थ होतात. त्यातील प्रत्येकी एक अर्थ दिला आहे, दुसरा अर्थ कोणता ते सांगा.** (९.५.१)

(१) चरण = पाय

चरण = ....................

(२) कीर्ती = मुलीचे नाव

कीर्ती = ....................

(३) उत्तर = प्रश्नाचे उत्तर

उत्तर = ....................

(४) किरण = व्यक्तीचे नाव

किरण = ....................

(५) पार = झाडाभोवतालचा ओटा

पार = ....................

(६) सर = बरोबरी

सर = ....................

(७) मान = मोठेपणा

मान = ....................

- **खालील शब्दसमूहांसाठी एक-एक शब्द सुचवा.** (९.५.१)

(१) मूर्ती तयार करणारा ....................

(२) मनाला मोहून टाकणारे ....................

(३) तीन पानांचा समुदाय ....................

(४) जंगलाला खूप मोठ्या प्रमाणात लागलेली आग ....................

(५) दिवसभरातील घडामोडींची नोंद केली जाते ती वही ....................

(६) शेतातील धान्य तयार होण्याचा काळ ....................

(७) केलेल्या उपकाराची जाण ठेवणारा ....................

- **खालील प्रत्येक गटातील शुद्ध शब्द ओळखा व त्यांच्या वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१)

(१) चातूर्य, (२) चातुर्य, (३) च्यातुर्य ..................

(२) अचानक, (२) आचानक, (३) अच्यानक ..................

(३) राजनिती, (२) राजनीति, (३) राजनीती ..................

(४) परीस्थिती, (२) परिस्थिती, (३) परिस्थीती ..................

(५) मनःपूर्वक (२) मनःपुर्वक, (३) मन्हाःपूर्वक ..................

(६) सुपिक (२) सूपिक, (३) सुपीक ..................

(७) आशीर्वाद (२) आशिर्वाद, (३) अशीर्वाद ..................

(८) सृष्टीसौंदर्य, (२) सृष्टिसौंदर्य, (३) सृस्टिसौंदर्य ..................

(९) गुत्पधन, (२) गुप्तधन, (३) गुप्तधण ..................

- **खालील वाक्ये वळणदार अक्षरांत लिहा.** (४.५.१)

(१) 'अहंकाराचा नाश करून कलेची साधना कर.'
(२) धनधान्यसंपन्न, कुळाची कीर्ती वाढवणारा शतायुषी हो.'
(३) आपल्यावर प्रेम करणाऱ्या माणसांचा आशीर्वाद घ्यायलाच हवा.
(४) गरिबांना अशीच मदत करावी, यातच जन्माचे भलेपण आहे.
(५) आज्ञापालन म्हणजे जीवन.
(६) विज्ञानाच्या उपासनेशिवाय देशाला तरणोपाय नाही.

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (५.५.१)

(१) चरणांचा दास होणे
(२) काळिमा फासणे
(३) अभिवादन करणे
(४) चीज होणे
(५) कष्टाचे खाणे
(६) होकार भरणे
(७) जलविहार करणे
(८) भान नसणे

- **खाली दिलेल्या विशेषणांची 'गुणविशेषण', 'संख्याविशेषण' आणि 'सार्वनामिक विशेषण' अशा तीन गटांत विभागणी करून लिहा.** (६.५.१)
खरा, थोडा, काही, श्रेष्ठ, तान्हे, कोवळे, तीन, कर्कश, पहिली, त्यांचे, विलक्षण, आठ, मोठा, स्फूर्तिदायक, खूप, असंख्य.

| गुणविशेषण | संख्याविशेषण | सार्वनामिक विशेषण |
|---|---|---|
| .................... | .................... | .................... |
| .................... | .................... | .................... |
| .................... | .................... | .................... |
| .................... | .................... | .................... |

- **खाली सर्वनामांचे प्रकार आणि त्यांची वर्णने दिलेली आहेत. त्यांच्या योग्य त्या जोड्या जुळवा.** (६.५.१)
(१) पुरुषवाचक – वस्तू दाखवण्यासाठी वापरायचे सर्वनाम
(२) दर्शक – प्रश्न विचारण्यासाठी वापरायची सर्वनामे
(३) संबंधी – व्यक्ती किंवा इतर वस्तूंसाठी येणारे सर्वनाम
(४) प्रश्नार्थक – जोडीने येणारी सर्वनामे

- **खालील वाक्यांतील गाळलेल्या जागी योग्य ती क्रियाविशेषणे वापरा.** (६.५.१)
(१) ............ पाऊस पडत असल्यामुळे मला देवळात जाता येईना.
(२) त्यानंतर त्या ............ वरच्या श्रेणीत चढत गेल्या.
(३) यंदाचा स्वातंत्र्यदिन आपण फारच ............ साजरा केला.

(४) आईने ............ शंभर रुपये मला दिले.

(५) घरट्याच्या वरच्या बाजूने अडई ............ उडाली.

(६) आम्ही अडई व तिच्या पिलांची ............ छायाचित्रे घेतली.

- **खालील शब्दांतील अशुद्ध शब्द शोधून ते शुद्ध स्वरूपात लिहा व त्यांचा वर्णमालेनुसार क्रम लावा.** (७.५.१)

  बंदीवान, दिङ्मुढ, मूर्ती, धिरगंभीर, अद्वितिय, विचलित, पलिकडे, पूर्वी, ढिग, कीर्ति, हळुहळू, खुदूखुदू, मुहुर्त, आचानक, नाहीसा, फिकिर, निमीत्त, मंदीर, राजनिती, रुढ, शतायुषी, आशिर्वाद, शरिररक्षक, निरिक्षक, आईवडिल, हिरीरीने, क्रीडा, नियमीत, उत्कृष्ट, उस्फुर्त, प्रीय, स्वातंत्र्यदिन, शारीरीक, बलीदान, सामुहिक, स्फूर्तिदायक, फुल, सृष्टीसौदर्य, कर्तृत्व, जीवन, प्रव्रत्ती, एकादा, चरित्र, श्रद्धा, अतीवृष्टी.

- **'कमावीसदार भयचकित मुद्रेने प्रवेश करतो.' या वाक्यात 'भयचकित' हे मुद्रेचे विशेषण आहे. अशाच प्रकारे 'मुद्रा' या नामाबद्दल आणखी कोणकोणती विशेषणे वापरतात ? अशा विशेषणांचा वाक्यात उपयोग करा.** (९.५.१)



